॥ श्री साईनाथ प्रसन्न ॥

संगीत

# पोटचा गोळा

[ स्वतंत्र सामाजिक नाटक ]

मुरारी गोपाळ शिवलकर
[ नांवलौकिक, मायेचं मोल,
अन्नदाता इत्यादि नाटकांचा कर्ता ]

किंमत दीड रुपया

रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४

# नाटक वाचण्यापूर्वी

"पोटचा गोळा" हें माझें तिसरें नाटक. सदर नाटक वाचकांच्या हवालीं करतांना मला अतिशय आनंद होत आहे. ज्यांच्या प्रेरणेनें मी हें नाटक लिहिलें, त्याबद्दल थोडासा खुलासा करणार आहे.

एकदां मी, धनुर्धारी पत्राचे संपादक श्रीयुत अ. सी. केळुसकर आणि माझे नाटककार मित्र श्री. स. ना. सूर्यवंशी हे हॉटेलमध्यें चहा घेत असतांना सहज विषयावरून विषय म्हणून नाटकाचा विषय निघाला; तेव्हां श्री. केळुसकर म्हणाले, "कौटुंबिक विषयावरचीं नाटकें रंगभूमिवर प्रयोगदृष्ट्या कधींही पडत नाहींत. कारण कौटुंबिक त्यागाला आपल्या महाराष्ट्रीय संस्कृतींत फार महत्त्व आहे." नंतर केळुसकर निघून गेले. मी आणि सूर्यवंशी घरीं जात असतांना त्यांना सांगितलें कीं मी कौटुंबिक त्यागावर नाटक लिहिणार आहे. तेव्हांच त्याचें नांव "पोटचा गोळा" देणार असेंही सांगून टाकलें. आणि आज त्याला मूर्तस्वरुप येत आहे !

नाटक लिहिल्यानंतर माझे मित्र श्री. वसंत दुदवडकर यांना तें वाचावयास दिलें. त्यानीं नाटक वाचून प्रयोगदृष्ट्या कांहीं सुधारणा सुचविल्या. त्यामुळें नाटकांतील बरेच दोष कमी झाले आहेत.

पहिल्यांदा "पोटचा गोळा" नाटक "स्वस्तिक नाट्य-निकेतन" या संस्थेतर्फे रंगभूमिवर येणार होतें. पण अपरिहार्य कारणामुळें तें शक्य झालें नाहीं. परंतु श्रीयुत डी. बी. असगोल्कर यानीं त्यांच्यामागें अडचणी असतांना सुद्धां जे श्रम घेतले आहेत त्याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

योगायोगानें "कलाकार मंदीर" (सात रस्ता) या नाट्यसंस्थेशीं माझे जिव्हाळ्याचे संबंध आले. त्यानीं माझ्याजवळ या नाटकाची मागणी केली, त्यांची नाटकाबाबत परिश्रम करण्याची वृत्ती पाहून मी नाटक त्यांच्या हवालीं केलें. "कलाकार मंदीर" चे निर्माते श्री. उत्तम शिंदे आणि त्यांचे सहकारी श्री. पांडुरंग मेजारी, राजा पांचाळ, जी. पवार, बी. घाटये, श्री. शांताराम रामाणे यांनीं अत्यंत मेहनत घेऊन चांगल्या स्वरुपांत हें नाटक रंगभूमिवर आणलें. त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. श्री. मेजारी

यानीं दिग्दर्शनाच्या बाबतींतही सहकार्य केलें आहे. संगीत दिग्दर्शक श्री. शशिकांत पराडकर यांनीं प्रसंगानुरुप चाली देऊन या नाटकाची रंगत वाढविली आहे. त्यांच्या सहकाऱ्यांनींही चांगली साथ दिली. माझ्या मित्रपरिवारांपैकीं श्री. भाई सावंत, जनार्दन सोहोने, लक्ष्मण मळेकर यांच्या सहकार्यांबद्दल आभार!

त्याचप्रमाणें रामकृष्ण बुक–डेपोचे मालक श्री. वि. र. बाम यांनीं सदर नाटकाच्या प्रकाशनाची जबाबदारी घेऊन फक्त आठदहा दिवसांतच सुबक सजावटींत पुस्तक वाचकांच्या हातीं दिल्याबद्दल मी त्यांचे प्रेमपूर्वक आभार मानतों. नेहमींप्रमाणें माझे मित्र श्री. बाबल हळदणकर यांनीं उत्कृष्ट छायाचित्रें घेतलीं आहेत. सौ. सरस्वती बोडस, कु. मनोरमा बेहेरे, सुमन नेमळेकर यांचेही श्रम नाट्यरंगतीला कारणीभूत आहेत.

नाट्यलिखाणाबद्दल कांहिंहीं न लिहीतां रसिक, टीकाकार आणि वाचक यांच्यावरच संपवितों. ‘नाट्यकला साधी व सोपी गोष्ट नाहीं, तें अवघड शास्त्र आहे’ याची जाणीव मला आहे; म्हणून अभ्यासू वृत्तीनें माझ्या लिखाणांतील दोष कमी करण्याचा प्रयत्न करीत आहे.

माझ्या नाट्यरसीकानों, हा “पोटचा गोळा” तुमच्या स्वाधीन करतो आहे. त्याला प्रेमानें आंजारा–गोंजारा; पण रागानें जमीनीवर आदळूं मात्र नका!

मोतीवाला बिल्डिंग, दुसरा माळा
खो. नं. ३५, एल्फिन्स्टन रोड
मुंबई १०

आपला कृपाभिलाषि
मु. गो. शिवलकर

या नाटकाचा प्रथम प्रयोग "कलाकार मन्दिर" (सात रस्ता) नाट्यसंस्थेनें दामोदर हॉल (परळ) येथें दिनांक २३-८-५३ रोजीं रात्रौ ८-३० वाजतां करून दाखविला. त्या वेळीं नाटकांत कामें करणाऱ्या कलावंतांचा परिचय.

| | | |
|---|---|---|
| नाना | : | श्री. पांडुरंग महादेव मेजारी |
| विनायक | : | ,, उत्तम विष्णू शिन्दे |
| मुकुंदा | : | ,, राजाराम गोविंद पांचाळ |
| बाजीराव | : | ,, गोविंद रामजी पवार |
| विश्वनाथ | : | ,, बी. घाटये |
| सगुणा | : | सौ. सरस्वती बोडस |
| सुनंदा | : | कु. मनोरमा बेहेरे |
| प्रभावती | : | ,, सुमन नेमळेकर |

| | | |
|---|---|---|
| दिग्दर्शक | : | श्री. मुरारी गोपाळ शिवलकर |
| संगीत दिग्दर्शक | : | ,, शशिकान्त पराडकर |
| पेटीवादन | : | ,, भार्गवराव पराडकर |
| तबलजी | : | ,, श्रीकांत पाटणकर |
| फिडल | : | ,, रामभाऊ शिवडीकर |
| | : | ,, उमाकांत चावडा |
| सतार | : | ,, पांडुरंग मोहिते |
| ट्रंपेट | : | ,, रघुनाथ खेमसे |
| ढोलक | : | ,, विष्णू जाधव |
| फ्ल्यूट | : | ,, सदाशिव मोरे |
| छायाचित्रें | : | ,, बाब्रल हळदणकर |
| मेकअप् | : | ,, टी. कुमार |

## रंगभूमीवर हुकमी रंगणारीं नाटकें!!

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ● कुटुंब – | दुदवडकर | ... | ... | १॥ रु. |
| ● संग्राम – | ,, | ... | ... | १॥ रु. |
| ● फिर्याद – | आयरे | ... | ... | १। रु. |
| ● मायेचा संसार – | ,, | ... | ... | १॥ रु. |
| ● बुद्धिभेद – | ,, | ... | ... | १॥ रु. |
| ● म्युनिसिपालिटी – | कै. माधवराव जोशी | | | १॥ रु. |
| ● वऱ्हाडचा पाटील – | ,, | | ... | १॥। रु. |
| ● बाईलवेडा – | गणेशशास्त्री फाटक | | ... | १। रु. |
| ● झुंझारराव – | कै. देवल | | ... | २ रु. |
| ● कन्यादान – | श्री. रांगणेकर | | ... | १। रु. |
| ● अलंकार – | ,, | | ... | १। रु. |
| ● गुंतागुंत – | कॅ. शिंदे | | ... | १॥ रु. |
| ● ४२ चें आंदोलन – | ,, | | ... | १॥ रु. |
| ● जानकी – | प्रो. ना. सी. फडके | | ... | १॥ रु. |
| ● काळे-गोरे – | ,, | ... | ... | १। रु. |

रा म कृ ष्ण बु क डे पो, मुं ब ई ४



श्री. शशिकांत पराडकर



श्री लक्ष्मणराव चाळके

**प्रभा :** आतां नाहीं होणार अशी चूक माझ्या हातून.

**सगुणा :** तसं कांहीं लिहून मागत नाहीं मी. आपली सूचना दिली. तुमचे लाड करते ना; तेच नडताहेत मला. सासूच्या धाकांतच ठेवायला हवं !

**प्रभा :** आम्हीं सासू म्हणून पाहातच नाहीं तुमच्याकडे. आमची आई असंच आम्हांला वाटतं. आमच्या नशिबानंच असली सासू मिळाली.

**सगुणा :** पुरे पुरे! माझी नको इतकी स्तुती करायला. भारी लाघवी पोर आहेस तूं!

**प्रभा :** आई! तुमच्या मायेची सावली आहे म्हणून तर माहेरची आठवण पडत नाहीं. सासर आणि माहेर यांतला फरकच समजत नाहीं.

**सगुणा :** ह्याच जाणीवेनं वागा आणि उभय कुळांचा नांवलौकिक वाढवा. सुनंदाचं धुणंपाणी आटोपलं नाहीं वाटतं ?

**प्रभा :** मघांच आटोपलं. कपडे वाळत घालताहेत. मी त्यांना सांगत होतें कीं मी धुणं धुवायला जातें, तर ताई म्हणाल्या मला चुलीजवळचं व्हायचं नाहीं.

**सगुणा :** अग शहरांत वाढलेली ती. लाकडाच्या धुरानं तीचा जीव कासावीस होतो. तुला आपलं पूर्वीपासूनच वळण आहे. खेड्यांत वाढलेली तूं!

**प्रभा :** पण माझी कुठं तक्रार आहे. आणि जेवण करणं मला फार आवडतं!

**सगुणा :** तूं जेवणांत हुशार आहेस हें मला ऐकून माहित होतंच. म्हणून तर तुझं नांव अन्नपूर्णा ठेवणार होतें. पण विनायक ऐकेना. मीं म्हटलं, बाबांनो तुम्ही शहाणे, मी आपली वेडी. मोठा दीर आहेस, ठेव नांव. काय ग, अन्नपूर्णा नांव कसं आहे ?

**प्रभा :** चांगलं आहे ना!

**सगुणा :** असं मनावरचं सांगू नकोस. त्या नांवांत किती अर्थ आहे तें तुम्हांला कळायचं नाहीं. आपली ती भिमा मावशी येते ना, तिच्या सुनेचं नांव आहे सुमलता आणि म्हणते शूर्पणखा! (दोघीही हंसतात) प्रभावती तूं घे जरा मोकळी हवा. मी टाकतें आंधणांत तांदूळ.

**प्रभा :** बसा तुम्हीं ! मी आटोपतें सारं लौकर. विश्रांती घ्या जरा.

**सगुणा :** अग कसली आलीय विश्रांती ? तुला माहित नाहीं प्रभावती. माझी सासू होती कडक स्वभावाची. पहांटे चारला दळण दळायला लावायची.

रात्रीं बारापर्यंत कामाचा रगाडा संपायचा नाहीं. जेवणखाण मात्र भरपूर. म्हणायची काय – काम करायचं दिवसभर आणि खायचं पोटभर. आणि वर काय सांगायची मला माहित आहे तुला?

**प्रभा :** मला कसं माहित असणार? तुम्हींच सांगा ना?

**सगुणा :** मला शब्दांत पकडलंस काय? (हंसते) म्हणायची – माझ्या राज्यांत तुला विश्रांती मिळायची नाहीं. उद्यां सुनेच्या राज्यांत रहा खुर्चीवर बसून.

**प्रभा :** मग बसा ना तुम्हीं! मी करतें जेवण.

**सगुणा :** तुम्हीं हल्लींच्या पोरी नाजूक, आमच्यासारखे कष्ट तुम्हांला व्हायचे नाहींत. (हंसत आंत जाते)

**प्रभा :** आमच्या सासूबाई अगदीं देवगुणाच्या आहेत. या घरांतलीं सारीं माणसंच सदा आनंदी. खरंच पूर्वपुण्याइनंच मी या घरांत पडलें!

[ **राग** – रागेश्वरी : **ताल** – दादरा ]

भूवरी आलें कां नंदनवन
प्रभु पावला जगज्जीवन ॥ धृ० ॥
हंसरा माझा मुकुंद मुरारी
प्रेमळ मी हो त्यांची राणी
सुखवीन सर्वां अर्पीन तन-मन ॥ १ ॥

[ गाणं संपतं, इतक्यांत बाहेरून मुकुंदा प्रवेश करतो. वय २३ ते २४ च्या दरम्यान. मोठी मिस्किल आहे स्वारी. पेहराव धोतर, शर्ट ]

**मुकुंदा :** वा! अगदीं गोड आवाज आहे ग तुझा!

**प्रभा :** (लाजून) ऐकलंत वाटतं माझं गाणं?

**मुकुंदा :** फक्त मधलाच चरण!

**प्रभा :** कोणता?

**मुकुंदा :** 'हंसरा माझा मुकुंद मुरारी'

**प्रभा :** तेवढाच चरण बरा ऐकूं गेला तुम्हांला.

**मुकुंदा** : माझं नांव होतं ना त्या चरणांत !

**प्रभा** : अस्सं ! अस्सं ! दुसऱ्यांचीं गाणीं चोरून ऐकतां काय ?

**मुकुंदा** : अग, मुकुंद मुरारी चोर होता असंच सांगितलं आहे नाहीं का कथापुराणांत ? मग त्या नांवांतलं थोडं साम्य माझ्यांत असायला नको का ?

**प्रभा** : अगदीं लबाड आहांत !

**मुकुंदा** : कोण मी ?

**प्रभा** : हो ! हो ! तुम्हींच.

**मुकुंदा** : कसा काय ग ?

**प्रभा** : मी नाहीं सांगायची.

**मुकुंदा** : पण मी लबाड नाहींच मुळीं. लबाड तूंच आहेस.

**प्रभा** : ती कशी काय ?

**मुकुंदा** : इतकं गोड गातां येतं हें कां लपवून ठेवलंस ?

**प्रभा** : कांहींतरीच ! इतका का गोड आवाज आहे माझा ? काय हो, लहानपणीं तुम्हींसुद्धां छान गाणीं म्हणायचेत असं आई सांगते.

**मुकुंदा** : आईचं फिरलंय डोकं ! अग माझ्या गाण्याची कल्पना नाहीं तुला. विनायकदादाचा आवाज जात्याच गोड आहे. तो गाणीं म्हणायचा तेव्हां मलाही हुक्की यायची. तेव्हां नाना काय म्हणायचे ठाऊक आहे तुला ?

**प्रभा** : काय ?

**मुकुंदा** : बाबा मुकुंदा, रेड्यासारखा रेकूं नकोस. कान फुटले माझे. (प्रभा हंसते) अग हंसतेस काय ? तेव्हां या वडील मंडळींनीं जर माझा विरस केला नसता तर एव्हांना पट्टीचा गवयी झालों असतों.

**प्रभा** : मग आतां म्हणाना एखादं गाणं. मी तरी ऐकेन.

**मुकुंदा** : तुझ्यासमोर आणि माझं गाणं ? मग निकालच लागला. तुझा जीव नको वाटतं तुला ?

**प्रभा** : म्हणजे काय ?

**मुकुंदा** : माझं गाणं ऐकून जीवंत माणसांचे मुडदे पडायचे. केव्हां मला गाण्याची लहर आलीच तर अगदीं निवांत जागीं गायला सुरुवात करतों— मनसोक्त गातों. कारण तिथं गाणारा मी आणि ऐकणारासुद्धां मीच !

**प्रभा :** पण मला एकदां ऐकायचं आहे तुमचं गाणं !

**मुकुंदा :** बायकोसमोर आपली बेअब्रु व्हावी अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. ए, तुला एक गंमत सांगतों हं ! मी मराठी चौथींत असतांना एक जोशी नांवाचे मास्तर बदलून आले होते. ते होते नाटकाचे हौशी. त्यांनीं शाळेंत दसरा-सम्मेलन करायचं ठरविलं आणि छोटीशी नाटिका बसवायला घेतली. मला त्यांत काम होतं, आणि गाणं होतं. भाषण चोख म्हणायचा पण गाणं आलं कीं पाय लटपटूं लागायचे. शेवटीं संमेलनाचे दिवशीं तेंच झालं. माझं गाणं एकीकडे, पेटीवाला दुसरीकडे आणि तबलजी तिसरीकडेच. लोकांची हंसून हंसून मुरकुंडी वळली. आणि मला इतका दरदरून घाम सुटला कीं पुढचं भाषणच विसरून गेलों.

**प्रभा :** वा ! बरीच कमाल केलीत. पुढं नाहीं का नाटकांत कामं केलींत कधीं ?

**मुकुंदा :** तसा निधड्या छातीचा आहे ग मी. शाळा सोडल्यावर एक दोन नाटकांत कामं केलीं. पण गाणं म्हटलं नाहीं. कारण कुठलही गाणं मी "जा के मथुरा या कान्हानें" याच चालीवर म्हणतों. सगळे राग पाठ आहेत मला.

**प्रभा :** मला ऐकवा ना एखादा राग.

**मुकुंदा :** माझ्या रागाचा अनुभव घ्यायचा आहे का तुला ? आतांच सत्यता, पटवून देतो.

**प्रभा :** नको ग बाई भलतंच धाडस !

**मुकुंदा :** नाहीं म्हणजे खात्रीच पटवून देतों.

**प्रभा :** आईला हांक मारीन हं ! मग संभाळा.

**मुकुंदा :** माझी आई आहे ती. माझाच कैवार घेईल.

**प्रभा :** आई ऽ ! अहो आई ऽऽ ! ! ( सगुणा येते )

**सगुणा :** काय ग कशाला हांक मारलीस ?

**प्रभा :** कांहीं नाहीं सहज !

**सगुणा :** काय रे तूं केव्हां आलास ? आणि विनायक कुठं आहे ? जेवणाला-सुद्धां वेळेवर येतां येत नाहीं तुम्हांला ?

**मुकुंदा :** मी मघांच आलों आहे. दादा विश्वनाथकडे गेला आहे; आतां येईल इतक्यांत.

**सगुणा :** सकाळपासून भटकत कुठं होतां ? घरची आठवण नाहीं का तुम्हांला ?

**प्रभा :** जेवणसुद्धां थंड झालं.

**मुकुंदा :** प्रभा ! जास्त बोलूं नकोस. नाहींतर थोबाड रंगवीन.

**सगुणा :** तर ! तर ! तुम्हांला तेवढाच उद्योग. ती म्हणाली त्यांत काय चूक झाली तिची ?

**मुकुंदा :** पण आम्हीं काय रोज भटकत असतों ? आज आपले सहज इकडे तिकडे गेलों म्हणून वेळ झाला.

**प्रभा :** म्हणून काय जेवणाचीसुद्धां आठवण नाहीं ?

**मुकुंदा :** आई, फार चढवून ठेवली आहेस तूं हिला ! फार चुरुचुरु बोलायला लागली आहे. माझ्या हातचा प्रसाद हवा आहे तिला.

**सगुणा :** अस्सं ! नवरेपणाचा हक्क गाजवायचा आहे वाटतं ? मार बघूं तिच्या थोबाडांत. बघूं दे तरी मला !

**मुकुंदा :** तूंच तिची बाजू घेऊन भांडूं लागलीस; तर ती उद्यां मानेल थोडीच !

**सगुणा :** मग काय तिच्यावर सासूचा अधिकार गाजवूं ? भाबडी पोर दिवसभर कामाच्या रगाड्यांत खपत असते. ( एकदम आठवण होऊन ) चुलीवरचा भात करपला असेल. ( घाईघाईनं आंत जाते )

**प्रभा :** कशी उडाली एका माणसाची !

**मुकुंदा :** चिडवूं नकोस हं मला !

**प्रभा :** काय करणार माझं ?

**मुकुंदा :** काय करणार ? थांब. देतोंच तुला बक्षीस !

[ मारायला धांवतो इतक्यांत बाहेरून सुनंदा येते. वय २० ते २१. देखणी. हसरा चेहरा. तिच्या हातांत ओल्या कपड्याचे पिळे असतात. ]

**सुनंदा :** भाऊ लपंडावाचा खेळ चालला आहे वाटतं ?

**प्रभा :** अग बाई—ताई ! ( आंत पळून जाते. )

**मुकुंदा :** वहिनी, उगाच तूं मधें आलीस—आज चांगलंच थोबाड रंगविणार होतों मी तिचं

**सुनंदा :** कां ? काय केलं तिनं ?

**मुकुंदा :** मला उलटीं उत्तरं देते.

**सुनंदा :** भाऊ ! नवराबायकोंत हें असं चालायचंच. प्रभा कांहीं उद्दाम स्वभावाची नाहीं. स्वभावानं अगदीं सालस आहे ती.

**मुकुंदा :** छान ! सगळ्यांनींच तिचं वकीलपत्र घेतलेलं दिसतं ! प्रत्येकजण तिची बाजू घेऊन भांडतो आणि शेवटीं मी मूर्ख ठरतों.

**सुनंदा :** [ विषयांतर करण्याच्या उद्देशानं ] भाऊ ! अजून हे आले नाहींत वाटतं ? कुठं गेले आहेत ?

**मुकुंदा :** गांव भटकतो आहे. वहिनी ! दादाशिवाय चैन पडत नाहीं वाटतं तुला ? येईल आतां.

**सुनंदा :** म्हणून नाहीं विचारलं मीं !

**मुकुंदा :** मग ?

**सुनंदा :** जेवणाची वेळ झाली नाहीं का ? थंड जेवणसुद्धां आवडत नाहीं त्यांना !

**मुकुंदा :** तें त्याला समजायला हवं. वहिनी ! रजा आहे ना त्याला म्हणून भटकतो आहे. आतां येईल इतक्यांत. [ विनायक येतो. वय २६-२८. हंसत-मुख. देखणा. ] हा बघ आला दादा—अगदीं शंभर वर्षं आयुष्य आहे.

**विनायक :** म्हणजे माझं आयुष्य वाढवण्याची स्पर्धा चालली होती वाटतं ?

**मुकुंदा :** तसं नाहीं रे, तुझी आठवण काढायला आणि तूं यायला एकच गांठ.

**विनायक :** तेव्हांच शंभर वर्षांचं आयुष्य बहाल केलंस काय ?

**मुकुंदा :** आणखी माझ्या आयुष्याचं उदक तुझ्या हातावर सोडूं का ?

**विनायक :** ए ऽ ! असा अमंगळ बोलूं नकोस.

**मुकुंदा :** काय झालं त्यांत दादा ? आमच्या घरचा कर्ता पुरुष तूं; आमचं आयुष्य तुला गेलं तर काय बिघडलं ?

**सुनंदा :** भाऊ ! खरंच दृष्ट लागायची तुमच्या असल्या बंधुप्रेमाला !

**विनायक :** सुनंदा ! याचं लग्न झालं पण पोरकटपणा अजून गेला नाहीं. कोणत्या वेळीं काय बोलेल त्याचा नियम नाहीं. फार प्रेमळ आहे मुकुंदा !

**मुकुंदा** : दादा! उगाच माझी स्तुति करूं नकोस. दुसऱ्याला मोठेपणा द्यायची संवयच आहे तुला.

**विनायक** : यांत मोठेपणा कसला? खरं तेंच सांगितलं मीं.

**मुकुंदा** : काय खरं आणि खोटं? भावाभावांनीं एकमेकांवर प्रेम करणं म्हणजे कांहीं विशेष आहे का?

**विनायक** : विशेष आहे म्हणूनच तर म्हटलं! एकमेकांचे जीव घेणारे भाऊसुद्धां माझ्या पाहाण्यांत आहेत.

**मुकुंदा** : मग त्यांना भाऊ म्हणणंच चूक आहे. पक्के वैरी ते. अच्छा दादासाहिब, वहिनी आणि आपण बोला. मी आंत जातों.

**विनायक** : कां रे?

**मुकुंदा** : तुमचा उभयतांचा कोंडमारा व्हायला नको.

**सुनंदा** : आमचं लग्न काहीं दोन दिवसांपूर्वी झालेलं नाहीं!

**विनायक** : आणि तूं असलास म्हणून बोलायला आम्ही कांहीं लाजणार नाहीं.

**मुकुंदा** : तें खरं आहे. पण तितकासा मोकळेपणा वाटणार नाहीं.

**विनायक** : आतां जातोस सरळपणानं कीं —

**मुकुंदा** : हाकलून देऊं? असंच ना?

**विनायक** : तुझ्या पाठींत रपाटा मिळाल्याशिवाय तूं कांहीं जाणार नाहींस. (मारायला धांवतो)

**मुकुंदा** : जातों बाबा! तुमच्या रंगाचा बेरंग करण्याइतका मी कांहीं मूर्ख नाहीं.

**विनायक** : चल हट्........(मुकुंदा आंत पळतो) पक्का वात्रट आहे.

**सुनंदा** : आपलेच बंधुराज ना?

**विनायक** : शाबास! शेवटीं मलाच उलटा केलास कीं! असो. ठीक आहे. हं! मग कसं काय बाईसाहेब, आपला राज्यकारभार कसा काय चाललाय?

**सुनंदा** : परतंत्र राणी राज्यकारभार कसा चालवणार? लग्न होण्यापूर्वी स्वतंत्र संसाराचीं किती सुखस्वप्नं आंखली होतीं मीं. अगदीं दोघांचा संसार! पण...........

**विनायक :** सुनंदा! हें कुठलं भलतंच वेड शिरलं तुझ्या डोक्यांत!

**सुनंदा :** हें वेड नाहीं. सत्य बोलतें आहे मी.

**विनायक :** हें बघ, असले विचार पहिल्यांदा मनांतून काढून टाक! हा आपलाच संसार आहे. आणि ह्या तुमच्या राज्यांत पूर्ण आबादीआबाद आहे ना?

**सुनंदा :** आमच्या राज्यांत पूर्ण आबादीआबाद आहे. राजराजेश्वर गादीवर नसले तरी राणीनं राज्यकारभार सुरळीत चालविला आहे.

**विनायक :** राजेसाहेब त्याबद्दल राणीसरकारचे अत्यंत आभारी आहेत. ( दोघंही हंसतात )

**सुनंदा :** का हो! आठवड्यांतून एक दिवस घरीं येतां तर बायकोजवळ बसायला घडीभरदेखील फुरसत नसते का तुम्हांला?

**विनायक :** अग देहानं जरी मी दूर असलो तरी मन घोटाळत असतं तुझ्या-भोंवतीं.

**सुनंदा :** माझ्या समजुतीकरतां हें सारं बोलणं.

**विनायक :** तुला खोटं वाटतं कीं काय? अग मामलेदार-कचेरींतील आंकडे-मोडीपेक्षां—माझी सुनंदाच माझ्या डोळ्यांसमोर असते!

**सुनंदा :** मग आंकडेमोडींत चुका होत असतील फार? ( दोघंही हंसतात )

**विनायक :** तसं नव्हे ग! पण सदैव तुझ्या आठवणींत मश्गुल असतों मी हें मला सांगायचं आहे.

**सुनंदा :** मग मला नाहीं का पहिला घांस घेतल्याबरोबर तुमची आठवण येते?

**विनायक :** आणि घांसच तोंडांत जात नसेल मग?

**सुनंदा :** ( वेडावून ) म्हणे घांसच तोंडांत जात नसेल? बायकांच्या मनाची कल्पनाच पुरुषांना नसते.

**विनायक :** इतर बायकांचं राहूं दे—माझ्या सुनंदाचं मन मात्र मला चांगलं कळतं. ( तिला जवळ घेतो. आंतून मुकुंदा येतो. )

**मुकुंदा :** मी आहे इथं. ( सुनंदा बाजूला होते. ) पाटावर बसून कंटाळलों आणि आलों बोलवायला.

**विनायक :** अरे! एक आठवड्यानं घरीं येतों मी. चार शब्द सुखानं बोलूं दे बायकोबरोबर.

**मुकुंदा :** मग! कुणाचा मज्जाव आहे तुला? पण पहिल्यांदा जेवून तर घे. ( त्याला ओढीत नेतो )

**सुनंदा :** किती प्रेम आहे यांचं एकमेकांवर?

[ **राग** – मिश्र पहाडी : **ताल** – झुमरा – कवाली ]

सुखावलें मी माझ्या सदनीं
रविराजाच्या मंगल किरणीं ॥ धृ० ॥
पतीप्रेमाच्या अमृतधारा
रोमांकित मम अणु अणु सारा
सागर सरिता अपूर्व मिलनीं ॥ १ ॥

[ गाणं संपतं इतक्यांत बाहेरून नाना आणि विश्वनाथ येतात. ]

**नाना :** सुनंदा! विनायक आणि मुकुंदा आले का बाहेरून?

**सुनंदा :** आले ना – जेवायला बसले आहेत. ( आंत जाते )

**विश्वनाथ :** नाना, तुमच्या घरचं हें एकंदर आनंदी वातावरण पाहिलं म्हणजे मला अतिशय आनंद होतो. सारं घर कसं अगदीं समाधानानं फुललेलं!

**नाना :** विश्वनाथ, सारी देवाची कृपा! माणसानं नेहमीं आनंदी राहायला शिकलं पाहिजे. संकटाला हंसतमुखानं तोंड दिलं पाहिजे.

**विश्वनाथ :** तुम्हींच म्हणून हें घर आबादीआबाद राखलंत, एवढी संकट-परंपरा कोसळली तरीसुद्धां. ( सगुणा येते ) कसं काय काकू ठीक आहे ना?

**सगुणा :** कोण विश्वनाथ? केव्हां आलास रे?

**विश्वनाथ :** आतांच. नाना आणि मी बरोबरच आलों.

**सगुणा :** तुझं जेवण वगैरे झालं का?

**विश्वनाथ :** जेवण झाल्यानंतरच बाहेर पडलों. नानांना भेटायला म्हणून मुद्दाम आलों होतों.

**नाना :** मला भेटायला ? मग येतांना बोलला नाहींस तो ?

**विश्वनाथ :** माझं काम रस्त्यांत कसं सांगू ? म्हटलं घरीं बसेन आणि सांगेन सर्व.

**नाना :** म्हणजे कांहीं विशेष आहे का ?

**सगुणा :** कांहीं खासगी असेल तर मी आपली जातें घरांत.

**विश्वनाथ :** काकू, तुमच्याजवळ कसलं आलंय खासगी ? माझ्या आईसारख्याच तुम्हीं मला.

**सगुणा :** मग सांग ना काय तें.

**विश्वनाथ :** अहो, चिंतामणीच्या घरच्या भानगडी. घरांतलीं भांडणं चव्हाट्या-वर जाण्याआधीं नानांच्या कानांवर घालण्यासाठीं पाठवलं मला चिंतामणीनं.

**सगुणा :** घरांतलीं भांडणं ?

**विश्वनाथ :** त्याच्या भावानं इस्टेटीसंबंधानं वाद निर्माण केला आहे ना ? हिस्से करून पाहिजे आहेत त्याला. भरलं घर फुटायची पाळी आली आहे.

**नाना :** त्यांना म्हणावं भरलं घर फोडूं नका. कुटुंबांत एकत्र रहाण्यांतच मोठा आनंद आहे. वाडवडिलांनीं जें जोडून ठेवलं तें तुकडे पाडण्यासाठीं का ? त्याचा समाईक रीतीनं उपभोग घेण्यांतच खरा आनंद !

**विश्वनाथ :** पण चिंतामणीचा कांहीं इलाज आहे का ? प्रत्येक बाबतींत त्याच्या दादाचा अरेरावीपणा – सगळ्याच बाबतींत हमरीतुमरीची भाषा – तो तर अगदीं कंटाळून गेलाय, घरदार सोडून कुठंतरी तोंड घेऊन जावं असं वाटायला लागलं आहे त्याला.

**नाना :** हें बघ, असले आततायी विचार पहिल्यांदा मनांतून काढून टाकायला सांग त्याला ! घर आहे, संसार आहे. चार माणसं चार विचाराचीं असतात. तिथं भांडणं व्हायचींच. पण एकानं गाय मारली म्हणून दुसऱ्यानं वासरूं मारायचं नसतं. आपणच शांतता घेतली पाहिजे. समजुतीनं वागलं पाहिजे.

**सगुणा :** विश्वनाथ, आम्हींसुद्धां असल्या प्रसंगाला तोंड देऊन हे दिवस पाहात आहोंत. तोंडाला तोंड दिलं कीं शब्दानं शब्द वाढत जातो. अशा वेळीं कुणीतरी एकानं पडती बाजू घेतली पाहिजे. ज्याला कुटुंब टिकवायचं असेल त्यानं भावनेच्या आहारीं जातां कामा नये.

**विश्वनाथ :** बिचाऱ्या चिंतामणीचा स्वभाव तुम्हीं म्हणतां तसाच आहे, म्हणूनच आजवर निभावलं आहे. नाहींतर...

**नाना :** भरल्या घरांतून बाहेर पडला असतां असंच ना? त्याला म्हणावं असले विचार मनांत आणणंसुद्धां पाप आहे. प्रत्येक माणसानं आपल्या कुटुंबाकरितां त्याग करायला शिकलं पाहिजे.

**विश्वनाथ :** पण त्यालासुद्धां मर्यादा असते ना? तोही माणूसच आहे. त्यालाही मन-भावना आहेत. कुठवर हें सहन करीत राहाणार?

**नाना :** कोणत्याही परिस्थितींत शांतवृत्तीला धक्का देऊं नये. जणूं कांहीं झालंच नाहीं असं समजून वागलं म्हणजे सारं कांहीं व्यवस्थित होईल.

**विश्वनाथ :** नाना, प्रत्यक्ष तुम्हीं गेल्याशिवाय कांहीं हा वाद मिटायचा नाहीं. मग येणार ना?

**नाना :** आनंदानं येईन. त्यांना गुण्यागोविंदानं नांदतांना पाहाण्यांतच मला आनंद आहे. अरे, त्याचे वडील असतांना आमचे काय बेत असायचे? आपलं आपलं कुटुंब कसं सुखी होईल ह्याच आमच्या गोष्टी!

**सगुणा :** मला नेहमीं म्हणायचे—वहिनी, एकत्र कुटुंबांतली भाजी-भाकरी खाण्यांतच मोठा आनंद असतो. मरेपर्यंत त्यांनीं आपलं म्हणणं खरं केलं!

**विश्वनाथ :** पण नारायणाला त्याचा विसर पडला ना? त्यांचे शब्द तो विसरला. मरतेसमयीं वडिलांनीं त्या दोघा भावांना सांगितलं होतं—भांडा झगडा, पण या घरांत दोन चुली पेटवूं नका.

**नाना :** अरे, त्याची काय बिशाद आहे स्वतंत्र संसार करण्याची? चांगला कान धरून त्याला विचारीन—वासूअण्णा वारल्याबरोबर सारं लयाला गेलं वाटतं? विचारण्याचा हक्क आहे मला.

**विश्वनाथ :** म्हणूनच तुमच्याकडे मला पाठविलं ना चिंतामणीनं? अधिकारानं सांगण्याइतका तुमच्याशिवाय पोक्त कुणीच नाहीं!

**नाना :** अरे, त्यांचे वडिलसुद्धां माझ्या शब्दाबाहेर गेले नाहींत कधीं, तर त्यांची काय मजल गेली आहे? चल आतांच निघतों तुझ्याबरोबर.

**सगुणा :** जेवण तयार आहे!

**नाना :** आधीं त्या दोघा भावांचा समेट आणि मग जेवण. तूं जेवण उरकून घे हं ! नाहीं तर रहाशील माझी वाट पाहात. [ जायला निघतात इतक्यांत आंतून मुकुंदा आणि विनायक येतात ]

**विनायक :** विश्वनाथ तूं केव्हां आलास ? आणि बाहेरच्च कां बसलास ?

**मुकुंदा :** घरांत यायला तंगड्या थकल्या वाटतं तुझ्या ?

**नाना :** मुकुंदा तूं अगदींच हा कसा रे ? तो कशासाठीं आला आहे, हें तरी विचारलं त्याला ?

**मुकुंदा :** म्हणजे ?

**नाना :** चिंतामणीच्या घरांत जोरदार भांडणं चालली आहेत. नारायण विभक्त होण्याची भाषा बोलूं लागला आहे. त्याचं टाळकं शुद्धीवर आणण्यासाठीं मी चाललों आहे.

**विनायक :** मग जेवून जात नाहीं ?

**विश्वनाथ :** नाना जेवून घ्या ना.

**नाना :** अरे जेवण रोजचंच आहे. जरा उशीर झाला तर कांहीं बिघडणार नाहीं. तूं इथंच रहा ! आलोंच मी.

**सगुणा :** चिंतामणीला म्हणावं समजुतीनं होऊं द्या सारं. उगाच डोकं भडकवून घेऊं नका म्हणावं.

**विश्वनाथ :** नाना करतील सारं ठीक.

**मुकुंदा :** ए आई, बाबा येईपर्यंत सावित्रीचं व्रत पाळणार का ?

**सगुणा :** तुमचं काय बाबा ! बायका आहेत तुमच्या. आमची थोडीच गरज आहे ? आम्हांला एकमेकाला सांभाळायलाच हवं.

**मुकुंदा :** आतां सरळपणानं जेवायला चल नाहींतर उचलीन आणि पाटावर नेऊन बसवीन. [ हात ओढीत ] चल पाहूं.

**सगुणा :** असं रे काय मुकुंदा ?

**विनायक :** मुकुंदा, सोड आईला.

**मुकुंदा :** फार दमबाजी करायला लागलास.

**विनायक :** पाहिजे वाटतं बक्षीस ?

**मुकुंदा :** काहीं इरकत नाहीं. थोरला भाऊ आहेस. चल ना आई !

**सगुणा :** ( त्याच्या पाठीवर रपाटा मारून ) चल बाबा, लग्न झालं तरी पोरकटपणा आहेच ! विश्वनाथ तूंही दोन घांस खा. चल ना.

**विश्वनाथ :** मी जेवून आलों काकू.

**मुकुंदा :** आणखी थोडा जेवलास तर कांहीं बिघडणार नाहीं. चल ना. चल ग आई. ( तिला ओढून नेतो. बरोबर विश्वनाथही आंत जातो )

**विनायक :** ( हंसत ) जितका द्वाड तितकाच प्रेमळ !

[ **राग** – मिश्रकाफी : **ताल** – त्रिताल ]

प्रिय बंधु सखा माझा ।
हांसे नाचे सदा विसांवा ॥ धृ० ॥
संसाराच्या भव्य सागरीं
जीवननौका हांकारितां परी
मज रक्षाया सदाच सजला ॥ १ ॥

[ गाणं संपतं इतक्यांत विश्वनाथ येतो. ]

**विश्वनाथ :** काय विनायक, खुशींत दिसत आहे स्वारी !

**विनायक :** ये दोस्ता ये ! अगदीं कडकडून भेट !

**विश्वनाथ :** एवढा प्रेमाचा पूर वाहूं लागला आहे ?

**विनायक :** तें तुला कळायचं नाहीं. आठ दिवसांनंतरची विरही भेट आहे ही ! ( मिठी मारतो )

**मुकुंदा :** दादा ! कुणाला मिठी मारली आहेस रे ?

**विश्वनाथ :** ( धापा टाकीत ) तूं आलास म्हणूनच सुटलों याच्या तावडींतून.

**मुकुंदा :** तसा घाबरतो मला दादा ! माझा वचक आहे तसा. घरांतलीं सारीं माणसं थरथर कापतात – एक शब्द बोलायची कोणाची प्राज्ञा नाहीं.

**विनायक :** बोलूनचालून तूं आडमुठ्या. तुझ्याबरोबर कोण टकरा देईल रे ?

**मुकुंदा :** आतां भलतंसलतं बोलशील तर दादाचं नातं गुंडाळून ठेवीन.

**विश्वनाथ :** होऊंदे बघूं दोघांची ! मी गम्मत तर बघेन.

**मुकुंदा :** अस्सं ! त्या अगोदर तुझींच हाडं खिळखिळीं करतों. ( आंगावर धांवतो )

**विनायक :** मुकुंदा ऽ ऽ – – –

**मुकुंदा :** माझा शब्द म्हणजे शब्द ! तूं गप्प रहा ! ( प्रभा येते )

**प्रभा :** भाऊ ! आई बोलावते आहे तुम्हांला.

**विनायक :** कोणाला मला ? प्रभा, याला आतां तूं तरी सुधार ! अकलेची आणि याची फारकत झालेली दिसते.

**मुकुंदा :** तूं काय हवं तें बोल, पण बायकोसमोर बेअब्रु करूं नकोस.

**विनायक :** बरं बाबा चूक झाली माझी. [ आंत जातो ]

**विश्वनाथ :** वहिनी, याला जरा अक्कल शिकव.

**प्रभा :** यांच्याइतकी अक्कल दुसऱ्या कोणाला आहे का ? माझ्या नवऱ्याइतका हुशार नवरा दुसरा कुठंच सांपडणार नाहीं.

**मुकुंदा :** हुशार आहे कीं नाहीं माझी बायको. किती मुली सांगून आल्या होत्या. पण या रत्नाची निवड केली.

**प्रभा :** भाऊ, थोडक्यांत सांगायचं म्हणजे काय, हे रत्नपारखी आहेत.

**मुकुंदा :** काय बायको आहे पहा ! मलाच उलटा करते आहे.

**प्रभा :** आतां गप्प बसायला काय घ्याल ?

**मुकुंदा :** सांगूं ? पण याच्यासमोर नको. हा ब्रह्मचारी उफाळून यायचा.

**प्रभा :** तुमच्या जिभेला जरा तरी हाड . . . !

**मुकुंदा :** अरे हुडत् ! माझ्या जिभेला हाड आहे कीं नाहीं तें तुला अजून समजलं नाहीं वाटतं ?

**विश्वनाथ :** ए मुकुंदा, मी इथं आहे याची तरी जाणीव ठेव. एकाला दुसऱ्याची साथ.

**मुकुंदा :** आमचा हा खेळकरपणा पाहून तुला लग्न करायची नक्की हुक्की येईल.

**विश्वनाथ :** हो, मळमळायला लागलं आहे खरं !

**मुकुंदा :** मग नक्की उलट्या होणार.

**विनायक :** ( प्रवेश करून ) कोणाला उलट्या होऊं लागल्या रे ? पेढ्यांची तयारी आहे का रे मुकुंदा !

**प्रभा :** इश्श ! ( आंत पळते )

**मुकुंदा :** पेढ्यांची तयारी माझी नाहीं. तूं केव्हां पेढे वाटण्याची संधि देतो आहेस त्याची वाट पहातो आहे मी. सातारी पेढे मागवणार आहे. केव्हां देणार रे पेढे ?

**विनायक :** वाट बघ - वाट बघ.

**मुकुंदा :** बघतो – बघतो हं !

**विश्वनाथ :** तुम्ही कोण रे पेढे वाटणार ? खरा हक्क माझा. चांगले चार मण पेढे वाटणार मी.

**मुकुंदा :** आधीं एक शेर तर मागव.

**विश्वनाथ :** शेराला सव्वा शेर भेटलास खरा.

**विनायक :** मुकुंदा आणि सव्वाशेर ? काडी पहेलवान आहे हा.

**मुकुंदा :** माझ्या ताकदीची कल्पना नाहीं तुला ! दिसायला जरी असा असलों तरी हजारबाराशें दंडबैठका सहज काढीन. कसं पिळदार आहे शरीर ?

**विनायक :** तर तर...गामापेहलवानच तूं. अगदीं वज्रदेही हनुमान !

**मुकुंदा :** मग आहेच मुळीं. माझ्या छातीकडे पाहून माझ्याजवळ येण्याची कुणाला छाती तरी आहे का ? ( सुनंदा येते ) ये वहिनी, तुझ्या नवऱ्याला जरा अक्कलकाढा पाज.

**विनायक :** माझ्याजवळ अक्कल पुष्कळ आहे. तूं मात्र अकलेच्या नांवानं कोरडा ठणठणीत.

**सुनंदा :** तरी म्हटलं घर अजून थंड कसं ?

**मुकुंदा :** हा बंडखोर गुंड घरीं आला म्हणजे झालीच भांडणाला सुरुवात.

**विनायक :** म्हणजे मी घरांत नको असंच ना ?

**विश्वनाथ :** कमाल आहे तुमची. सख्खे भाऊ आहांत अस्सं कुणाला सांगूनसुद्धां खरं वाटणार नाहीं. ए ! आतां माझं ऐकाल का जरा !

**विनायक :** ऐकण्यासारखं असलं तर जरूर ऐकूं.

**मुकुंदा :** सांग बघूं काय तें?

**विश्वनाथ :** तुमचं भांडण बंद करून डोकं जरा थंड करा.

**मुकुंदा :** आमचीं डोकीं शांतच आहेत. तुझंच भडकलेलं दिसतं आहे.

**सुनंदा :** भाऊंचं आपलं कांहींतरीच. ते काय म्हणतात तें ऐकून तर घ्या जरा. दुसऱ्याचं जरा ऐकावं—आपलंच घोडं पुढं दामटूं नये.

**मुकुंदा :** आमच्या घोड्याला लगाम घातला—मग तर झालं. माझ्या वहिनीची आज्ञा म्हणून शांतपणानं ऐकतों सारं.

**विश्वनाथ :** असं जरा माणसांत येऊन बोल. प्रत्येक बाबतींत वाह्यातपणा.

**मुकुंदा :** वहिनी—!

**सुनंदा :** भाऊ, काय सांगतां आहांत तुम्हीं?

**विनायक :** आटोप बाबा झटपट.

**विश्वनाथ :** आपल्या गांवांत वाचनालय सुरू करायचं आहे, त्या संबंधानं सभा घ्यायची आहे ना आज?

**विनायक :** अरे हो, मी विसरून गेलों होतों.

**विश्वनाथ :** मागच्या रविवारीं तूंच सांगितलंस कीं पुढच्या रविवारीं सभा घेऊं आणि आतां तुझ्याच आठवणींत नाहीं! अगदीं विसरभोळा आहेस.

**मुकुंदा :** वहिनी समोर असली म्हणजे सारं कांहीं विसरून जातो.

**सुनंदा :** मी जातेंच कशी! माझ्यामुळं कुणाला नको त्रास व्हायला.

**मुकुंदा :** रागावलीस वाटतं? अग मी लाडका दीर ना तुझा? थट्टा करण्याचा अधिकार आहे मला.

**विश्वनाथ :** झालं. सैतान मूळपदावर आला.

**मुकुंदा :** माझ्या तोंडाला कुलूप घालून ठेवतो मग तर झालं. (बाजूला जाऊन बसतो)

**विश्वनाथ :** मग काय विनायक, घ्यायची सभा? तुझ्या मार्गदर्शनाची फार आवश्यकता आहे. आम्हां सर्वांत जाणतां तूंच आहेस.

**मुकुंदा :** बाकीचे सारे मूर्ख आहेत?

**सुनंदा :** तोंडाचं कुलूप उघडलं वाटतं? काय पण प्रतिज्ञा!

**विनायक :** तो आणि गप्प बसणार? मग निकालच लागला.

**विश्वनाथ :** मग निघायचं ना?

**विनायक :** चल ना! माझी तयारी आहे. चल रे मुकुंदा, येतोच मी लौकर.

**सुनंदा :** पण...

**मुकुंदा :** रात्रीं बोला सावकाश. चल रे दादा (त्याला ओढतो) चल.

**विनायक :** अरे पण...

**मुकुंदा :** चल म्हणतो ना? (त्याला ओढून नेतो)

**सुनंदा :** एक आठवड्यानं यायचं तर बायकोबरोबर बोलायला घडीची फुरसत नाहीं. आम्हीं यांच्या वाटेकडे डोळे लावायचे आणि यांनीं गांव हुडकायचे. लग्न झालं म्हणजे स्त्रियांच्या मताला किमतच राहात नाहीं.

[ **राग** – दुर्गा : **ताल** – त्रिताल ]

लग्नबंधनीं प्रबला अबला
जगीं चाले हा खेळ सारा ॥ धृ० ॥
मम आशांचे उंच मनोरे
परवशतेच्या उदरीं सारे
नच उरला – मज थारा – स्वैर विहारा ॥ १ ॥

[ गाणं संपतं इतक्यांत बाजीराव प्रवेश करतो. हातांत एक चामड्याची बॅग. पेहराव पॅंट, बुशकोट, गळ्याला मफलर. ]

**बाजीराव :** ताई!

**सुनंदा :** कोण? बाजीराव! केव्हां आलास?

**बाजीराव :** आतांच. आमचा मेहुणा कुठं आहे?

**सुनंदा :** कसलीशी सभा आहे तिकडे गेले आहेत–एवढ्यांत येतील. पाहातोस काय असा माझ्याकडे?

**बाजीराव :** माझीच ताई किंवा दुसरं कोण याची खात्री करून घेतों आहे. ज्ञीच ताई ना तूं?

**सुनंदा :** म्हणजे रे काय ?

**बाजीराव :** पांच वारी जॉर्जेटच्या साड्या नेसणारी माझी बहीण, आणि आतां नऊ वारी साडी नेसणारी आजीबाई – केवढा फरक पडला आहे तुझ्यांत !

**सुनंदा :** लग्न झालं आहे माझं.

**बाजीराव :** लग्न झाल्याबरोबर सारे मनोरथ कोसळून पडले का ?

**सुनंदा :** म्हणजे ! मी नाहीं समजलें.

**बाजीराव :** असा वेडेपणा पांघरून मला फसवण्याचा प्रयत्न करण्यांत काय अर्थ आहे ? कुठं गेल्या त्या समान हक्काच्या वल्गना ?

**सुनंदा :** खऱ्या जीवनाचा अर्थ न कळलेल्या तुझ्या बहिणीची पोपटपंची होती ती ! प्रेमाच्या एकछत्री साम्राज्यांत समान हक्काच्या कल्पना कुठल्या कुठं विराम पावतात. तुझी बहीण अगदीं आनंदांत आहे.

**बाजीराव :** वरकरणी आनंदाचं सोंग केल्यानं खरा आनंद का कुणाला लाभत असतो ? या समर्थनांत तुझा परावलंबीपणा मला स्पष्ट दिसतो. आपली दिशा चुकलेला माणूस दुसऱ्याची दिशाभूल करीत असतो.

**सुनंदा :** दिशाभूल तुझी झाली आहे. इतकीं प्रेमळ माणसं दुसरीं कुठंच सांपडणार नाहींत.

**बाजीराव :** या प्रेमळपणाच्या आड तुझा दुबळेपणा झांकण्याचा प्रयत्न चालला आहे – किती हास्यास्पद आहे तो !

**सुनंदा :** तुझ्यापेक्षां या घरांतल्या माणसांच्या स्वभावाची मला चांगलीच कल्पना आहे. दिसतं तसं नसतं.

**बाजीराव :** दिसतं तसं नसतं म्हणून जग फसतं असंच ना ? जाऊं दे. तुझं सुख तुला लखलाभ होवो. तुझी सासू सासरा घरांत आहेत ना ?

**सुनंदा :** नाना बाहेर गेले आहेत. आई घरांत आहे – हांक मारते हं ! आई ! अहो आई ! (आंतून–'काय ग सुनंदा') बाहेर या जरा. मुंबईहून बाजीराव आला आहे.

**सगुणा :** (प्रवेशून) बाजीराव, बरं आहे ना बाबा ? आईवडील खुशाल आहेत ना ?

**बाजीराव :** सर्व खुशाल आहेत. तुम्हीं सारी मंडळी खुशाल आहांत ना ?

**सगुणा :** चाललंय झालं! कसा काय झाला तुझा प्रवास?

**बाजीराव :** अगदीं मजेंत.

**सगुणा :** पत्र तरी पाठवायचं होतंस – कुणाची तरी बैलगाडी पाठवली असती बंदरावर.

**बाजीराव :** बैलगाडींतून माझी मिरवणूक काढायची होती वाटतं?

**सगुणा :** बाबारे, आम्हीं खेड्यांतलीं माणसं – मोटारी कुठून आणायच्या? कपडे उतर – प्रभाला चहा करायला सांगतें. प्रभा – एऽ प्रभा – (प्रभा येते)

**प्रभा :** काय आई? भाऊ, बरं आहे ना?

**बाजीराव :** ठीक. मुकुंदा कुठं आहे?

**सगुणा :** तो आणि विनायक कसल्याशा सभेला गेले आहेत. बोला तुम्हीं भावंडं. आम्हीं चहाची तयारी करतों. चल ग प्रभा. (जातात)

**बाजीराव :** तुझी सासू अगदीं धडधाकट आहे ग!

**सुनंदा :** तूं म्हातारा झालास वाटतं?

**बाजीराव :** माझी तब्येत सणसणीत आहे. खेड्यांत राहून तूं मात्र आजीबाई चांगली शोभतेस. कसं काय करमतं ग या गांवात तुला?

**सुनंदा :** तुमच्या मुंबईपेक्षां आमचं हें खेड फार बरं. स्वच्छ हवापाणी – मोकळं वातावरण –

**बाजीराव :** विनायकसारखा प्रेमळ नवरा, सुनेचे लाड करणारी सासू आणि –

**सुनंदा :** पुरे – पुरे, उगांच अकलेची उधळपट्टी करूं नकोस.

**बाजीराव :** अकलेची उधळपट्टी! तुझा हा अंबाबाईचा अवतार बघून मला चीड आली आहे तुझी. या खेड्यांत अशीच सडत कुजत रहाणार तूं? ताई, तुझ्या स्वतंत्र विचारांची वाऱ्यावर वरात निघाली वाटतं?

**सुनंदा :** आल्यापासून सारखा उपरोधीकपणानं बोलतो आहेस – झोकून नाहीं ना आलास?

**बाजीराव :** झोंकायची संवय मला नाहीं, पण तुला मात्र कुटुंबांतील प्रेमळपणाचा कैफ चढलाय.

**सुनंदा :** माझ्या संसारांत मी सुखी आहें – त्याची काळजी तुला नको.

**बाजीराव :** तुझा संसार? तुला स्वतंत्र अस्तित्व आहेच कुठं? सासू-सासऱ्याच्या शब्दाबाहेर तुला किंवा तुझ्या नवऱ्याला जातां येईल का?

**सुनंदा :** इथं कोण कुणावर सत्ता गाजवीत नाहीं. सारीजणं एकमेकाची सत्ता आनंदानं मान्य करतात.

**बाजीराव :** त्याशिवाय मार्गच नाहीं दुसरा. सवता सुभा करण्याची कुणाची छाती आहे का? तुझ्या नवऱ्यानं तुझ्याकरतां काय केलं आहे ग आजपर्यंत? तुझ्या मनाजोगती एखादी वस्तु आणली आहे का कधीं?

**सुनंदा :** पण मी कशाचा हट्टच धरला नाहीं.

**बाजीराव :** हट्ट धरून बघ – चांगली थप्पड बसेल तुला! तुझी ही स्थिती समजली मला म्हणून तुझी कानउघडणी करण्यासाठीं इकडे आलों आहे मीं. आपलं व्यक्तित्व विसरणाऱ्या माणसाच्या डोळ्यांत चांगलं झणझणीत अंजन घालायला हवं – त्याशिवाय त्याचे डोळे उघडणार नाहींत. तुझा नवरा पगार कुणाच्या हातीं देतो?

**सुनंदा :** नानांच्या.

**बाजीराव :** किती पगार आहे तुझ्या नवऱ्याला?

**सुनंदा :** मला माहित नाहीं. आणि त्यांच्या पगाराशीं मला काय करायचं आहे? सर्व कांहीं मला मिळतंय.

**बाजीराव :** भ्रमांत आहेस तूं अजून! स्वातंत्र्याची मोकळी हवा मिळूं नये म्हणून मैनेला सोनेरी पिंजऱ्यांत ठेवतात. तिथून तिला बाहेर पडायला मिळत नाहीं – गजावर डोकं आपटून स्वस्थ बसावं लागतं. या घरांतला सारा प्रेमळपणा तुझ्या दुबळेपणाला कारणीभूत झालाय.

**सुनंदा :** बाजीराव! –

**बाजीराव :** बाजीराव बरोबर बोलला. खोटं बोलायची संवय नाहीं त्याला. (हंसतो)

**सुनंदा :** असा पिसाटासारखा हंसूं नकोस. तुझ्या कल्पनेची भरारी किती फोल आहे याचाही अनुभव येईल तुला.

**बाजीराव :** आतां राहाणारच आहे मीं आठ दिवस. घे एखादा नवऱ्याजवळ हट्ट आणि पटव माझी खात्री!

**सुनंदा :** बरं बरं! देईन खात्री पटवून. (नाना येतात) नाना आले.

**बाजीराव :** नमस्कार नाना!

**नाना :** छान! बाजीरावानं गरिबांकडं पायधूळ झाडली तर! आमचे व्याही कसे काय आहेत?

**बाजीराव :** खुशाल आहेत. कुठं गेला होतां एवढ्या दुपारीं ?

**नाना :** सांगतों हं ! सुनंदा याच्या खाण्यापिण्याची व्यवस्था झाली कीं नाहीं ?

**सुनंदा :** आतांच आला–चहा तयार होतो आहे–तुम्हांला आणूं का चहा ?

**नाना :** मला नको. ( सुनंदा जायला निघते ) हें बघ, तुझ्या सासूला बाहेर पाठव. ( सुनंदा आंत जाते ) काय बाजीराव, काय म्हणते आहे तुमची मुंबई ?

**बाजीराव :** ठाकठीक चालली आहे. तुमचं कसं काय चाललंय् ?

**नाना :** आम्हां खेड्यांतल्या खेडवळांना खेड्यांतच आनंद–तुमची मुंबई परवडायची नाहीं. ( सगुणा येते )

**सगुणा :** मिटलं का भांडण ?

**नाना :** मला पाहिल्याबरोबर सुतासारखा सरळ आला ! एक शब्दसुद्धां बोलला नाहीं.

**सगुणा :** एक शब्दसुद्धां बोलला नाहीं ?

**नाना :** बोलायला तोंड आहे का त्याला ? एक शब्द उलट बोलला असता तर थोबाड रंगवून काढलं असतं. कुटुंब फोडायला निघाला–

**बाजीराव :** ( चमकून ) कुणाबद्दल बोलतां ?

**नाना :** माझ्या एका मित्राच्या मुलाबद्दल. त्याची स्वतःची बुद्धी नाहीं–दुसऱ्याची शिकवण. सुखानं चाललेल्या कुटुंबांत फाटाफूट करणारे लोक आहेत ना या जगांत ? असलीं हीं बाडगुळं जिथल्यातिथं छाटून टाकलीं पाहिजेत.

**सगुणा :** हें बघा, बाजीराव आणि तुम्हीं बरोबरच जेवायला बसा–मी करतें तयारी.

**नाना :** त्यांचा समेट करून त्यांना एका ताटांत बसवलं आणि मीही त्यांच्या सोबत जेवलों. बाजीरावाची व्यवस्था बघा. ( जाते ) बरं का बाजीराव, भरलं घर फोडणाऱ्या माणसाला मी दारांतदेखील उभा करणार नाहीं.

**बाजीराव :** अरे बापरे ! ( सुनंदा चहाचा कप घेऊन येते )

**नाना :** तूं कशाला घाबरतोस ? माझं घर फोडायला थोडाच आला आहेस ?
( सुनंदाच्या हातून कप पडून फुटतो. )

**सुनंदा :** नाना !........

( **पडदा** )

अंक पहिला समाप्त

# २

[ सजावट पहिल्या अंकांतील. स्थळ तेंच. विनायक पुस्तक वाचीत बसला आहे. आंतून सुनंदा येते. एका बाजूला उभी रहाते. थोड्या वेळ्ानं विनायक पुस्तकांतून नजर काढतो तोंच सुनंदा दिसते. ]

**विनायक :** काय ग, अशी मुखस्तंभाप्रमाणं उभी काय राहिलीस ? इकडे ये ना !

**सुनंदा :** आहे त्याच ठिकाणीं चांगली आहे.

**विनायक :** अगदीं रागांत दिसते आहे स्वारी !

**सुनंदा :** माझ्या रागालोभाची पर्वा आहे कोणाला ?

**विनायक :** या विनायकाला. ( जवळ जाऊन ) कां ? काय झालं ?

**सुनंदा :** त्याची चौकशी तुम्हांला कशाला ?

**विनायक :** माझ्याशिवाय तुझी चौकशी कोण करणार ?

**सुनंदा :** मला कळतंय तें !

**विनायक :** आज रागाचा पारा चढला आहे वाटतं ? कारण तर कळूं दे.

**सुनंदा :** कारण कळलं तरी काय होणार तें माहीत आहे मला. उगाच लाखाचा शब्द फुकट जायचा.

**विनायक :** सरळपणानं बोलायचं नाहीं अशी शपथ घेतली आहेस कीं काय आज ?

**सुनंदा :** मीं नेहमीं सरळच बोलतें, पण दुसऱ्यांना पटायला हवं ना !

**विनायक :** सांगून तर बघ.

**सुनंदा :** ऐकायची तयारी आहे ?

**विनायक :** अगदीं ! हें बघ पुस्तक फेकलं बाजूला. सांग पाहूं काय तें.

**सुनंदा :** पगार झाला तुमचा ?

**विनायक :** हो – झाला ना !

**सुनंदा :** तुमच्याजवळ आहे की नानांजवळ ?

**विनायक :** माझ्याजवळ आहे – कां ?

**सुनंदा :** मग चला बाजारांत – मला एक पातळ घ्यायचं आहे.

**विनायक :** म्हणजे काय ?

**सुनंदा :** पातळ हवंय मला.

**विनायक :** आपण कशाला आणायचं ? आई आणील ना !

**सुनंदा :** म्हणजे तुमच्या पगारांतून बायकोला पातळ घ्यायचीसुद्धां सत्ता तुम्हांला नाहीं असंच ना ?

**विनायक :** अगदीं असंच कांहीं नाहीं – पण –

**सुनंदा :** समजतं मला सारं. पण – परंतुची कांहींच गरज नाहीं.

**विनायक :** पण स्वतःच्या मर्जीनं मीं खर्च केला नाहीं अजून. मला खर्चाला पाहिजेत तेवढे पैसे नाना देतात. मग त्यांना न विचारतां मीं जर तुला पातळ घेतलं तर वाईट नाहीं का वाटणार त्यांना ?

**सुनंदा :** वाईट वाटण्याचा प्रश्नच आला कुठं इथं ? बायकोला हौसेमौजेनं एखादी वस्तु घ्यायची सत्ता नाहीं तुम्हांला ?

**विनायक :** असं मुळींच नाहीं. नाना मला एका शब्दानंदेखील विचारणार नाहींत – पण माझ्या पगारांतील पैसे विचारल्याशिवाय खर्च केले तर तें शल्य त्यांना बोंचल्याशिवाय रहाणार नाहीं.

**सुनंदा :** तुम्हीं इतके दुबळे असाल याची कल्पना नव्हती मला.

**विनायक :** दुबळेपणा कसला त्यांत ? नाना जोंपर्यंत शीरावर आहेत तोंपर्यंत त्यांच्या आज्ञेंत वागायलाच हवंय.

**सुनंदा :** म्हणजे माझ्या भावनांना किमतच नाहीं जशी !

**विनायक :** इथं कोणी कुणाच्या भावनांची पायमल्ली करीत नाहीं. उलट एकमेकांच्या भावना जोपासण्याचा प्रयत्न करतात.

**सुनंदा :** तसं असतं तर साधं पातळ घेण्याच्या प्रश्नाला एवढे फाटे फुटले नसते.

**विनायक :** हें बघ, भलताच वितंडवाद घालूं नकोस. आई म्हणत होती कीं या महिन्यांत पातळं घ्यायचींच आहेत.

**सुनंदा :** आई म्हणत होती आणि नाना म्हणणार होते! तुम्हांला स्वतंत्र असं मत नाहीं?—त्यांच्या शब्दावरच तुमची सारी मदार.

**विनायक :** पण त्यांत अपमान वाटण्यासारखं कांहींच नाहीं. आजपर्यंत आपल्या भावना मारून जो त्यांनीं आमच्यासाठीं एवढा त्याग केला, त्याची आठवण ठेऊन त्यांच्या आज्ञेंत वागणं हें माझं कर्तव्य आहे.

**सुनंदा :** ठीक आहे. माझा शब्द फुकट जाईल अशी जर मला कल्पना असती तर तें सांगण्याचा मूर्खपणा मी कधींच केला नसता.

[ आंतून बाजीराव येतो ]

**बाजीराव :** कसली मूर्खपणाची बडबड चालली आहे इथं ?

**विनायक :** तुझ्या बहिणीलाच विचार.

**बाजीराव :** काय झालं ग ताई ?

**सुनंदा :** त्याची चौकशी तुला कशाला हवी ?

**बाजीराव :** तुझा भाऊ म्हणून. बहिणीच्या सुखदुःखाची काळजी हें भावाचं कर्तव्यच आहे.

**सुनंदा :** कांहीं नको काळजी वाहायला. ज्या दिवशीं तुझ्या बहिणीचं लग्न झालं त्याच दिवशीं ती मेली असं समज !

**विनायक :** बाजीराव ! ऐकलंस हें उपरोधीकपणाचं बोलणं ?

**सुनंदा :** माझं बोलणं उपरोधीक—आणि तुमचं ?

**बाजीराव :** अरे भांडतां काय अशीं ? असं झालं तरी काय ?

**विनायक :** काय व्हायचं ?—मूर्खपणा आहे सारा.

**सुनंदा :** मी मूर्खच आहें—तुमचा शहाणपणा उगाच उघळूं नका.

**विनायक :** सुनंदा—

**बाजीराव :** म्हणजे हा प्रकार आहे तरी काय ?

**सुनंदा :** झाला प्रकार समजून तुला काय करायचंय ? तूं आजच्या आब जायला नीघ बघूं !

**बाजीराव :** म्हणजे माझ्यावरून भांडण चाललंय वाटतं? तसं असेल तर माझी आतांच निघायची तयारी आहे. माझ्यामुळं तुमचं भांडण व्हायला नको.

**विनायक :** बाजीराव, तिचं काय ऐकतोस? शुद्धीवर नाहीं ती!

**सुनंदा :** मी चांगली शुद्धीवर आहे. माझी तुम्हांला किती किंमत आहे तेंही कळलं मला. तुम्हीं आपल्या कुटुंबांतील माणसाच्या भावना सांभाळीत बसा!

**बाजीराव :** म्हणजे कुटुंबकलह सुरू झाला वाटतं? मीं आलों तेव्हां मला काय व्याख्यान ऐकवलंस—आणि आज ही भाषा? पण नवराबायकोचा एवढा खटका उडायला कारण तरी काय घडलं?

**विनायक :** तिला पातळ हवं आहे—आणि तें मी घ्यावं असा तिचा आग्रह आहे.

**बाजीराव :** हेंच जर भांडणाचं मूळ असेल तर घेऊन या पातळ. त्यासाठीं एवढं भांडण कशाला?

**सुनंदा :** पण नानांना काय वाटेल?—आई काय म्हणेल?

**बाजीराव :** नाना—आई काय बोलणार त्यांत? आपल्या बायकोच्या मनासारखी वस्तु घ्यायचा अधिकार नाहीं वाटतं विनायकाला?

**सुनंदा :** आईवडिलांच्या भावना दुखवून कसं चालेल?

**विनायक :** सुनंदा, तुझ्यापेक्षां ज्यांनीं आजचा विनायक बनविण्यासाठीं हाडाचीं काडं केलीं त्यांच्या प्रेमाची मला जास्त किंमत आहे! त्यांचा त्याग केव्हांही श्रेष्ठ आहे!

**बाजीराव :** यांत कसला आला आहे त्याग? मुलांना मोठं करणं—शिक्षण देणं हें आईबापांचं कर्तव्यच आहे.

**विनायक :** मग त्यांच्या कर्तव्याची जाणीव ठेवणं हें मुलांचं कर्तव्य नाहीं का?

**बाजीराव :** पण आपल्या बायकोकरतां पातळ घेणं यांत कांहीं मोठासा अपराध नाहीं. अनाठायीं तर पैशाची उधळपट्टी करीत नाहींस ना? आईवडिलांनीं मुलांच्या भावना सांभाळायलाच हव्यात.

**विनायक :** असंच जर तुमचं म्हणणं असेल तर घेतों मी पातळ. जा तुझे कपडे बदल. बाजीराव, तूंही चल.

**बाजीराव :** जा ताई, आटोप लौकर. ( सुनंदा जाते ) आलोंच मी कपडे करून. ( आंत जातो )

**विनायक :** माझी चूक तर होत नाहीं ना? केवळ यांच्या शब्दाला बळी पडून मी माझ्या आईवडिलांच्या मनाला दुखवीत तर नाहीं ना? कसा पेंचप्रसंगांत सांपडलों आहे मी!

[ **राग** – मालकंस : **ताल** – त्रिताल ]

अधीर या मना कुणी सांवरा
वाहूं लागला वादळी वारा ॥ धृ० ॥
अंधःकारमय पथ दिसतां मज
उजळाया द्या तेजोवलया
थरथरला मम देहच सारा ॥ १ ॥

[ गाणं संपल्याबरोबर विनायक आंत जातो–
दुसऱ्या बाजूनें बाजीराव सुनंदा येतात. ]

**बाजीराव :** आतां कुठं तुझ्या हक्काची जाणीव झाली. असल्यांचं नाक दाबल्याशिवाय तोंड उघडणार नाहीं.

**सुनंदा :** पण भलताच प्रसंग तर येणार नाहीं ना?

**बाजीराव :** घाबरूं नकोस ग. तुझा हा पाठिराखा भाऊ आहे ना तुझ्या पाठीशीं?

**सुनंदा :** केवळ तूं चिडवलंस म्हणून मीं हें साहस केलं आहे. माझ्या निश्चयाचा डोलारा अजून डळमळतो आहे.

**बाजीराव :** वादळ सुटलं म्हणजे संसारनौकेला हादरे बसायचेच. अशा वेळीं धीर सोडतां नये माणसानं. आजची संधि गेली तर पुन्हां येणार नाहीं– या कुटुंबांत सडत कुजत रहावं लागेल.

**सुनंदा :** पण–

**बाजीराव :** पण केला आहेस तो शेवटास ने! मध्येंच कच खाल्लीस तर निकालच लागला. त्यांत घाबरण्यासारखं काय आहे? तुझ्या नवऱ्याजवळ हट्ट धरला आहेस ना तूं? मग झालं तर.

**सुनंदा :** पण भलतंच कांहीं झालं तर ? –

**बाजीराव :** बाजीराव बरोबर करील. ( आंतून विनायक येतो )

**विनायक :** चला –

**बाजीराव :** चला – चला ! वेळ नको. ( जायला निघतात इतक्यांत बाहेरून मुकुंद येतो )

**मुकुंद :** म्हणजे ? निघालांत कुठं ?

**बाजीराव:** फिरायला.

**मुकुंद :** मग त्या दोघांत तुझी अडचण कशाला ? तूं रहा माझ्या जोडीला.

**बाजीराव :** प्रभा आहे घरांत. येतों आम्हीं. ( जातात )

**मुकुंद :** अजब आहे हा प्राणी. आतां घरांत काय करते आहे आमची राणी ? प्रभा ए प्रभा – ( आंतून – 'आल्यें हं आल्यें' ) ये ये माझी गुणाची बाय ती ! तुझ्या भेटीसाठीं जीव खालींवर होतोय् सारखा – ( प्रभा येते ) आलीस ? ये ! ( एकदम मिठी मारायला जातो – प्रभा बाजूला होते )

**प्रभा :** हें काय भलतंच ? पाहिल ना कुणी.

**मुकुंद :** सगळे घराबाहेर पडले आहेत. आणि बायकोला मिठी नाहीं मारायची तर काय झाडाला मिठी मारायची ?

**प्रभा :** काय हा भलताच पोरकटपणा ?

**मुकुंदा :** हा पोरकटपणा नाहीं – प्रेमांतला मूर्खपणा म्हणतात याला.

**प्रभा :** बाहेरून कुणी आलं तर ?

**मुकुंदा :** त्याचा दारांतच मुडदा पडेल.

**प्रभा :** नाना आणि आई आली तर ?

**मुकुंदा :** आपल्या प्रेमाला पूर आलेला पाहून आनंदानं त्यांचा ऊर भरून येईल.

**प्रभा :** सगळ्याच गोष्टींत तुमचा पोरकटपणा.

**मुकुंदा :** मग काय म्हातारचळ लागल्यासारखं करूं ? काय ग, दादा–वहिनी गेलींत कुठं ?

**प्रभा :** तुम्हांला भेटलीं ना ?

मुकुंदा : भेटली म्हणूनच विचारतों.

प्रभा : मग त्यांना विचारायचं होतं—मी काय सांगणार ?

मुकुंदा : तुला ठाऊक नाहीं का ?

प्रभा : बाजारांतून येतों असं म्हणाली ताई.

मुकुंदा : छान ! नाना—आई बाहेर, दादा—वहिनी बाजारांत आणि आम्हीं —

प्रभा : राजा—राणी घरांत ! ( दोघंही हंसतात ) काय हो ! मला न सांगतां कसल्या कामासाठीं गेलां होतां हो ?

मुकुंदा : नानांनीं पाठवलं होतं एका कामासाठीं. काम झालं नाहींच—उन्हामुळं डोकं मात्र दुखायला लागलं.

प्रभा : भटकायचं थोडं ! उगाच फिरायची संवय आहे तुम्हांला.

मुकुंदा : तर—तर ! तेवढाच मला उद्योग ! तूं मोठी कामाची ग !

प्रभा : मग ! आहेंच मुळीं.

मुकुंदा : भडकलेलं डोकं आणखीं भडकवूं नकोस.

प्रभा : तुमचं डोकं सदा तापलेलं. बाहेरचा राग काढायला हक्काची बायको आहे ना घरांत !

मुकुंदा : मग काय लोकांच्या बायकांवर रागावूं ? हक्काच्या माणसांवरच हक्कानं रागवायचं असतं.

प्रभा : आणि तुमच्यावर माझा हक्क नाहीं वाटतं ? मी कांहीं बोललें म्हणजे नाकाला मिरच्या झोंबतात.

मुकुंदा : तूंच आहेस आधीं तिखट मिरची. मी आपला साधा भोळा आहे म्हणून ठीक—नाहींतर कमरेंत लाथ बसली असती.

प्रभा : कमरेंत लाथ बसायच्या आधींच तंगडं फिरवून ठेवलं असतं.

मुकुंदा : बरीच पुढं मजल गेली आहे तुझी.

प्रभा : घाबरूं नका हो. तुम्हीं लाथ मारलीत तर पाय धरीन तुमचे. पायाची दासी आहे मी !

मुकुंदा : तर—तर ! पायाच्या दास्या हल्लीं नवऱ्याच्या डोक्यावर पाय ठेवूं लागल्या आहेत—पण तूं त्यांतली नाहींस—फार सज्जन आहेस तूं.

**प्रभा :** तुमची पुण्याई थोर म्हणूनच माझ्यासारखी बायको मिळाली.

**मुकुंदा :** हो ना! माझी पुण्याई थोर म्हणूनच हिरकणी शोधतां शोधतां गारगोटी पदरांत पडली.

**प्रभा :** हो – हो – गारगोटी आहे मी! चकमक झडेल तेव्हां समजेल.

**मुकुंदा :** आज अगदीं रंगांत आहेस ग –

**प्रभा :** माझा रंगनाथ आहे ना जवळ?

**मुकुंदा :** तेव्हांच तुला हे ढंग सुचले आहेत! पण मला असले थेर आवडणार नाहींत – सांगून ठेवतों.

**प्रभा :** कुणाला आवडले नाहींत तर मलाही पर्वा नाहीं – सांगून ठेवतें.

**मुकुंदा :** माझ्याशीं तीन – पांच?

**प्रभा :** मग काय तीन – तेरा करूं?

**मुकुंदा :** हा तेरड्याचा रंग नाना आणि आई आलीं नाहींत तोंपर्यंतच. मग राहाशील चुलींत तोंड खुपसून!

**प्रभा :** म्हणूनच तर आई माझं नांव अन्नपूर्णा ठेवणार होत्या.

**मुकुंदा :** मोठी अन्नपूर्णा आहेस – माहीत आहे मला. अजून भाकऱ्या भाजायला येत नाहींत –

**प्रभा :** नावडतीचं मीठ अळणी.

**मुकुंदा :** माझी वहिनीच जेवणांत हुशार आहे. कस फक्कड करते जेवण? हाताचा वास जात नाहीं.

**प्रभा :** जेवण मीच करतें.

**मुकुंदा :** असं? तेव्हांच मला जेवण जात नाहीं. तीन पौंड वजन घटलं.

**प्रभा :** बायकोची स्तुति केली तर नवऱ्याला महापाप लागायचं.

**मुकुंदा :** म्हणून तर तुझी स्तुति करीत नाहीं. पापाचे डोंगर फेडूं कुठं? ए अन्नपूर्णे, उद्यांपासून जेवण करूं नकोस तूं.

**प्रभा :** (रागानं) नाहीं करणार. वहिनींच्या हातचं जेवण जेवा!

**मुकुंदा :** जेवीन – जेवीन. तुझी मिजास नको!

**प्रभा :** मी नाहीं कुणाजवळ मिजास करीत – माझं मोठेंपण माझ्याजवळ!

**मुकुंदा :** रडतेस कीं काय ? उगी — उगी.

**प्रभा :** बघा हं आतां — कळली तुमची माया.

**मुकुंदा :** अरेच्या ! खरंच रडूं लागलीस ? अग सहज थट्टा केली मीं.

**प्रभा :** मला माहित आहे. बोलायचं तेवढं बोलून घेतां आणि शेवटीं थट्टा केली म्हणून सांगतां. तुमचा स्वभाव मला चांगला माहित आहे. जरा कांहीं झालं कीं उगीचच रागवायची संवय झाली आहे तुम्हांला !

**मुकुंदा :** वेडी आहेस. माझ्या रागांत तुझ्यावरचं उत्कट प्रेमच असतं. ज्या माणसांबरोबर आपला एकजीव झालेला असतो त्याच्यावरच रागवायचं असतं. त्यांत द्वेष नसतो तर एकमेकांवरच्या प्रेमाचं सारसर्वस्व सांठविलेलं असतं.

**प्रभा :** आणि मी तरी माझा हक्क आहे म्हणूनच रागवतें ना तुमच्यावर ?

**मुकुंदा :** त्याची मला कल्पना नाहीं का ? पण कांहीं गोष्टी अशा असतात कीं बोलून दाखविण्यांत त्यांची किंमत कमी होते. एकमेकाच्या भावपूर्ण नजरेंत त्याचं उत्तर सांठवलेलं असतं.

**प्रभा :** समजतं मला.

**मुकुंदा :** समजतं ना ? मग रडतेस कशाला ? हंस — हंस ना ! हंस — हंस ग ! ( हंसते ) झालं. हंसतां हंसतां रागावलीस आणि रागावली असतांनाच हंसलीस.

**प्रभा :** मला हंसवण्याची किल्ली तुमच्याजवळच आहे.

**मुकुंदा :** म्हणूनच तर दुसऱ्याच्या हातीं देत नाहीं.

**प्रभा :** तुमचं हें बडबडणारं तोंड बंद करण्याची किल्ली मला सांपडली असती तर फार बरं झालं असतं.

**मुकुंदा :** अग तोडाला तोड दिलंस कीं माझं तोंड बंद ! चल, आटोप लवकर — उगाच वेळ नको.

**प्रभा :** झाला फाजीलपणा सुरू.

**मुकुंदा :** तुम्हीं बायका मोठ्या लबाड. मनापासून सारं कांहीं हवं असतं, पण वरकरणी मात्र भलताच संभावीतपणा. नवराबाकोनं जर असलीं बधनं स्वीकारलीं तर वंशवेल वाढायची कशी ? दोघांचीं लग्न झालीं — पण अजून पाळणा कांहीं हलत नाहीं घरांत. तसाच धूळ खात पडलाय.

**प्रभा :** बांधा घरांत पाळणा आणि झोके द्यायची सुरुवात करा.

**मुकुंदा :** झोके द्यायची माझी तयारी आहे — पण धोका पतकरायला तूं तयार हवीस ना ?

**प्रभा :** मी आपली घरांत जातें कशी —

**मुकुंदा :** जा — जा — खुशाल जा. मी इथं माशा मारीत बसतों.

**प्रभा :** माशा मारीत कशाला ? माझ्याजवळ बसा. चला ना ! चला —

**मुकुंदा :** मी स्वस्थ बसणार आहे थोडाच !

**प्रभा :** मग भाकऱ्या भाजायला मदत करा.

**मुकुंद :** थांब तर मग ; तवा तापलाय् का बघून येतों. ( आंत जातो )

**प्रभा :** किती भाबडा स्वभाव आहे यांचा ? हे असे आहेत म्हणूनच तर मला प्राणापेक्षां प्रिय आहेत.

[ **राग मिश्र : ताल** — केरवा ]

प्रीतिपुष्प वाहिलें चरणीं ।
तूं राजा, मी राणी
जगताच्या अंगणीं ॥ धृ० ॥
सदा हास्य मुखावरी विलसे ।
विसरुनी रुसवा मानस माझें खुलतें ।
धुंद मन मग गाई गाणीं ॥ १ ॥

[ गाणं संपत इतक्यांत विश्वनाथ येतो. ]

**विश्वनाथ :** काय वहिनी, एकट्याच घरांत ? मुकुंदा कुठं आहे ?

**प्रभा :** घरांत आहेत.

**विश्वनाथ :** दुसरं कोण आहे ?

**प्रभा :** एकटेच आहेत.

**विश्वनाथ :** एकटाच काय करतोय ?

**प्रभा :** तवा तापला कीं नाहीं तें पहायला गेले आहेत.

**विश्वनाथ :** म्हणजे भाकऱ्या भाजायला लावला आहेस कीं काय त्याला? मुकुंदा, ए मुकुंदा! ( मुकुंदा येतो ) काय करीत होतास रे?

**मुकुंदा :** तूं कोण विचारणारा?

**विश्वनाथ :** तुझा दोस्त.

**मुकुंदा :** गेलास उडत. माझ्या कारभारांत कुणी ढवळाढवळ केलेली आवडत नाहीं मला.

**विश्वनाथ :** पण काय ढवळीत होतास तें तरी सांग.

**मुकुंदा :** काय वाटेल तें ढवळीन – माझा मी मुखत्यार आहे – काय ग प्रभा?

**प्रभा :** हं! अगदीं बरोबर आहे.

**मुकुंदा :** हुशार आहे कीं नाहीं. सारखी चुलीजवळ असते – म्हणून थोडी अक्कल वितळून गेली.

**विश्वनाथ :** आणि तुझी वाया चालली आहे!

**मुकुंदा :** वाया नाहीं मूर्खा – वाढीला लागली आहे.

**विश्वनाथ :** काय रे, सगळीच मंडळी गेली कुठं?

**मुकुंदा :** नाना आणि आई कांहीं कामासाठीं सकाळींच गेलीं आहेत बाहेर.

**प्रभा :** ताई आणि भाऊ बाजारांत गेलीं आहेत.

**विश्वनाथ :** आणि बाजीराव?

**मुकुंदा :** त्यांच्याबरोबरच आहे.

**विश्वनाथ :** मुकुंदा, तुला राग येणार नाहीं ना?

**मुकुंदा :** कशाबद्दल?

**विश्वनाथ :** मी जें बोलणार आहे त्याबद्दल.

**मुकुंदा :** आला राग तर आला. सांग बघूं.

**विश्वनाथ :** हा बाजीराव कांहीं तितकासा सरळ माणूस दिसत नाहीं. तोंडावर बरी गोड बोलत असला तरी आंतल्या गांठीचा दिसतो.

**मुकुंदा :** असेना का? आम्हांला काय करायचं आहे? राहील चार दिवस आणि जाईल आपल्या घरीं.

**प्रभा :** तसे स्वभावानं मोकळे आहेत ते.

**विश्वनाथ :** वहिनी, तुझ्यावरून जगाची पारख करूं नकोस. तूं आपली भाबड्या स्वभावाची – सर्वांबरोबर मिळून मिसळून वागतेस – पण कांहीं लोक गोडगोड बोलूनच आग लावणारे असतात.

**मुकुंद :** बाजीरावाबद्दल का बुवा तुझं मन कलुषीत झालंय ?

**विश्वनाथ :** तसं कांहीं कारण नाहीं – पण काल मी आलों तेव्हां तो आणि वहिनी कांहींतरी बोलत होतीं. मी आल्याबरोबर अगदीं चपापल्यागत झालीं दोघंही. 'कसलं आलंय एकत्रित कुटुंब' हे शब्द फक्त मीं ऐकले बाजीरावचे.

**मुकुंदा :** सुतानं स्वर्गाला जायची संवय आहे तुला. त्यांचं एखाददुसऱ्या विषयाबद्दल बोलणं चाललं असेल.

**विश्वनाथ :** तसं असेल तर ठीकच. नाहींतर सुखानं चाललेल्या कुटुंबांत कलह सुरूं करायचा.

**मुकुंदा :** त्याची काय बिशाद आहे ? माझा दादा जोंपर्यंत सरळ आहे तोंपर्यंत त्याला विचारतो कोण ? दादा असल्या बाजारबुणग्यांच्या शब्दाला कधींही किंमत देणार नाहीं.

**विश्वनाथ :** मला तरी काय, तेंच हवंय. वहिनी, तूं कांहींच बोलत नाहींस ?

**प्रभा :** तुम्हीं बोलतां, मी ऐकतेंय.

**मुकुंदा :** माझ्यासमोर एक शब्ददेखील बोलत नाहीं ती. स्वभावानं शांत, मनाची प्रेमळ आणि पडवळासारखी सरळ आहे.

**प्रभा :** मी आपली कशीतरी असेन – तुम्हांला काय करायचं आहे ?

**मुकुंदा :** विश्वनाथ, ऐकलंस बाबा उत्तर ? मीं कांहीं बोललों कीं वाकडं उत्तर द्यायची संवय आहे हिला. सरळ बोललीस तर पाप लागेल का ?

**विश्वनाथ :** आतां भांडायला सुरुवात करणार आहांत का ?

**मुकुंदा :** आम्हीं भांडलों तरी गोडही लौकर होतों – नाहीं प्रभा ?

**प्रभा :** आम्हीं मुळीं भांडतच नाहीं.

**विश्वनाथ :** हें मला सांगतां ?

**मुकुंदा :** म्हणजे काय ?

**विश्वनाथ :** सतरा वेळां तुमचीं भांडणं ऐकलीं आहेत मीं.

**मुकुंदा :** त्याला काय भांडण म्हणायचं? प्रेमाचे संवाद ते.

**प्रभा :** तुमचं लग्न झाल्याशिवाय तुम्हांला अनुभव येणार नाहीं. खरं ना हो?

**मुकुंदा :** अगदीं खरं!

**विश्वनाथ :** एकमेकांचे साक्षीदार बरे आहांत. अगदीं हात जोडले तुम्हांला.

**मुकुंदा :** यांत हात जोडण्यासारखं काय आहे?

**विश्वनाथ :** छे–छे, नाक घांसून नमस्कार घालायला हवा!

**मुकुंदा :** नमस्कार केलास तर लवकर लग्न होण्याचा आशीर्वाद देईन.

**विश्वनाथ :** तुझ्या आशीर्वादापेक्षां शाप पुरवला. काय रे मुकुंदा! विनायक बाजारांत कशासाठीं गेला?

**मुकुंदा :** मीं घरांत आलों आणि तो बाहेर गेला–विचारायलासुद्धां मिळालं नाहीं–आल्यावर कळेलच.

**विश्वनाथ :** मी जातों आतां. विनायकाला भेटायला पुन्हां यावं लागेल.

**मुकुंदा :** कां? कांहीं महत्त्वाचं काम आहे का?

**विश्वनाथ :** आमच्या जमीनीचे उतारे काढून आणायचे आहेत. त्यासंबंधीं विचारायचं आहे त्याला.

**मुकुंदा :** मग बैस ना थोडा वेळ. येईल इतक्यांत दादा.

**विश्वनाथ :** मला आतां वेळ नाहीं; नंतर येईन.

**मुकुंदा :** मीं थांब म्हटल्यावर थांबायला हवं! अस्मादिकांच्या शब्दाला किंमत आहे.

**प्रभा :** बसा तुम्हीं. मी चार भाकऱ्या टाकतें.

**मुकुंदा :** मी येऊं जवळ बसायला?

**प्रभा :** बाहेरच बसा. माझ्याजवळ बसलांत तर एक काम धड व्हायचं नाहीं.

**मुकुंदा :** माझी मदत होईल तुला.

**प्रभा :** मदत? कामाचा खोळंबा मात्र होईल. बसा!

[ प्रभा आंत जाते. बाहेरून नाना आणि सगुणा येतात. ]

**सगुणा :** मुकुंदा!

**मुकुंदा :** आलां तुम्हीं ? आटोपलीं सारीं कामं ?

**सगुणा :** आटोपलीं बाबा. बाजारहाट घेऊन झाला—थोडे कपडे घ्यायचे आहेत ते उद्यां बघूं.

**मुकुंदा :** आणि लग्न ठरवायला गेलां होतां त्याचं काय झालं ?

**नाना :** तें पण ठीक झालं. पोरीला स्थळ मात्र चांगलं मिळालं. अगदीं बाळबोध वळणाचं घराणं.

**विश्वनाथ :** कांहीं वादविवाद नाहीं ना झाला ?

**नाना :** छे ! छे !! मुळींच नाहीं.

**विश्वनाथ :** भावाभावांचा समेट झाल्याबरोबर चिंतामणीनं बहिणीचं लग्न ठरवून टाकलं—आणि मोकळा झाला एकदांचा बापाच्या वचनांतून. काकू, नानांच्या शब्दाला मान दिला हो सोयरे मंडळींनीं.

**सगुणा :** पोरच नशीबवान आहे. बापाच्या पाठीमागं भावांनीं हौसमौज पुरवली—सासरही चांगलं मिळालं. सोन्याचा संसार आहे पोरीचा.

**विश्वनाथ :** एकंदरींत छान झालं. काकू, नानांनीं पुढाकार घेतला म्हणूनच सारीं कामं बिनबोभाट पार पडली.

**नाना :** अरे, त्यांत कांहीं विशेष केलं नाहीं मीं. माझं कर्तव्यच केलं. त्यांचे वडिल असते तरी लग्नाची जबाबदारी मलाच घ्यायला हवी होती.

**मुकुंदा :** आतां विश्वनाथचंसुद्धां लग्न ठरवा.

**नाना :** का तुला जोड्यानं मिरवायचं आहे वाटतं ?

**मुकुंदा :** छे ! छे !! असं कांहीं नाहीं.

**नाना :** नाहीं होय कसलं आलंय त्यांत ? त्याच्या लग्नाची जबाबदारी तुम्हींच घ्यायला हवी.

**मुकुंदा :** तसं असेल तर मुलगी शोधायला लागतों.

**सगुणा :** आधीं तांब्याभर थंड पाणी आण—तहान लागली आहे मला.

**मुकुंदा :** चहा करायला सांगूं काय ?

**सगुणा :** कां ?—जेवण तयार नाहीं अजून ? विनायक कुठं आहे ? त्यानं रजा घेतली आहे ती गांव भटकायला का ?

**मुकुंदा :** दादा, वहिनी आणि बाजीराव बाजारांत गेले आहेत. प्रभा घरांत आहे.

**नाना :** बाजारांत कशाला ?

**मुकुंदा :** मीं कांहीं विचारलं नाहीं. आल्यावर समजेलच.

**सगुणा :** बोलत राहूं नकोस – आधीं पाणी आण.

**मुकुंदा :** प्रभा, ए प्रभा –

**सगुणा :** तिला कशाला हांक मारतोस ? जेवण करते आहे ना ती ? तूंच जा. ( मुकुंदा जातो. ) घरांत असला म्हणजे त्या पोरीला घडीभर बसूं देत नाहीं. ( प्रभा पाणी आणते – मागोमाग मुकुंदा येतो ) शेवटीं तिलाच पाणी आणायला लावलंस ना ?

**मुकुंदा :** नाहीं – तीच म्हणाली मीच आईला पाणी देतें.

**प्रभा :** आई आटोपली का खरेदी ? कपडे घेतलेत का ?

**सगुणा :** आज बाकीचा बाजारहाट केला – उद्यां कपडे घ्यायचे. तुम्हां दोघींनांही उद्यां लुगडीं घेणार आहे.

**नाना :** मी कांहीं उद्यां येणार नाहीं. जमिनीच्या मोजणीसाठीं जायचं आहे. लुगडीं चांगलीं घे हो – लग्नही आलंय जवळ चिंतामणीच्या बहिणीचं.

**सगुणा :** मला समजतं बरं ! तुम्हीं कशाला सांगायला हवं ?

**नाना :** ठीक – ठीक ! मी जरा न्हाणीघरांत जाऊन पायांवर गरम पाणी घेतों.

( नाना आंत जातात. )

**विश्वनाथ :** काकू, मी जातों आतां.

**सगुणा :** सहज आला होतास ना ?

**विश्वनाथ :** विनायकला भेटायला आलों होतों – पण त्याचा अजून पत्ता नाहीं. आणि मला जायचं आहे बाजारांत – जातों मी.

**सगुणा :** थांब ! विनायक येईल आतां.

**विश्वनाथ :** विनायक बाजारांत गेला आहे – तो कसला लवकर येतो ?

**मुकुंदा :** पण तुझं आतांच काय एवढं काम अडलं आहे बाजारांत ?

**विश्वनाथ :** माझीं कामं मला माहीत – शिवाय चिंतामणीला मदत करायला हवी.

**मुकुंदा :** अरे हो, माहीत आहे! आमचीं लग्न झालीं नाहींत वाटतं?

**विश्वनाथ :** पण जबाबदारी तुमच्यावर नव्हती.

**सगुणा :** अरे विश्वनाथ, या मुकुंदाचं लग्न ठरलं ना – तेव्हां हा बाहेर पडायला लाजायचा.

**मुकुंदा :** मी कशाला लाजतोंय्? कावीळ झालेल्या माणसासारखी अंगाला हळद लागल्यामुळं माझी तशी स्थिती झाली होती. तुझ्या लग्नांत समजेल तुला.

**विश्वनाथ :** बरं बरं! तूं असशीलच तेव्हां माझ्या जोडीला. बरं जातों मी. (जातो)

**मुकुंदा :** आई, मलाही कोटाला कापड घे हं! फाटला आहे तो.

**प्रभा :** कुठं फाटलाय्? अजून नवाच आहे.

**मुकुंदा :** त्याचे दोन भाग होतील तेव्हां फाटला असं वाटेल तुला. परवां सहज झटकला तर त्याच्या फाटक्या कॉलरमधून सतरा झुरळीं बाहेर पडलीं. आई, घेणार ना कापड?

**सगुणा :** पहिल्यांदा त्या दोघींना दोन ठेवणीचीं लुगडीं घ्यायला हवींत. लग्नकार्यांचे दिवस आहेत. तुमचं चालून जाईल.

**मुकुंदा :** तूं कापड तर आणूं नकोस – तुझीं हाडं खिळखिळीं झालींच म्हणून समज. नाहींतर दादालाच आणायला सांगतों. मग कटकटच मिटली.

**सगुणा :** तो तरी कुणाच्या हुकमानं आणील? (बाहेरून सुनंदा व बाजीराव येतात.) आलांत? या! – आणि विनायक कुठं आहे?

**सुनंदा :** कोणाबरोबर तरी रस्त्यांत बोलत राहिले आहेत.

**बाजीराव :** मी कपडे बदलतों हं! (खोलींत जातो.)

**सगुणा :** हें पुडकं कसलं ग? आणि बाजारांत कशाला गेलां होतां?

**सुनंदा :** पातळ आणायला.

**सगुणा :** बाजीरावानं घेतलं वाटतं?

**सुनंदा :** नाहीं – यांनीं घेतलं. पसंत आहे तुम्हांला?

**सगुणा :** एकच घेतलं वाटतं? – बाजारांत गेलां होतां तर प्रभालाही घ्यायचं होतं पातळ.

**सुनंदा :** किंमती वाढल्या आहेत हल्लीं. रंग बरा आहे ना ?

**सगुणा :** तुमच्या आवडीनं घेतलेला रंग—माझ्या पसंतीची काय गरज आहे ? आणि काय ग, तुला पातळ घ्यायला पैसे होते आणि प्रभाला घ्यायला पैसे नव्हते वाटतं त्याच्या खिशांत ?

**मुकुंदा :** पण झालं काय त्यांत ? मागाहून घेतां येईल. तूं चल जेवायला वाढ. चल ना !

**सगुणा :** चल ग प्रभा. ( सगुणा, प्रभा, मुकुंदा जातात. )

**सुनंदा :** जा म्हणावं. मी नाहीं करीत कुणाच्या रागालोभाची पर्वा ! यापुढं मी माझ्या मताप्रमाणं वागणार. माझ्या अशा वागण्यामुळंच मला स्वतंत्र संसाराचं सुख अनुभवायला मिळेल. मन कसं आनंदानं फुलून गेलं आहे अगदीं !

[ **राग** – मिश्र भीमपलास : **ताल** – केरवा ]

थय थय नाच रे मन मोरा
उभारुनी तव दिव्य पिसारा ॥ धृ० ॥
विहगासम घे उंच भरारी
स्वातंत्र्याच्या नील आकाशीं
दिपुनी जाऊं दे भूलोक सारा ॥ १ ॥

[ गाणं संपतांच बाजीराव येतो. ]

**बाजीराव :** तुझ्या सासूला पातळ पसंत पडलं का ?

**सुनंदा :** पातळ मी नेसणार आहे. दुसऱ्याच्या पसंतीची जरूरी नाहीं मला. प्रत्येकाच्या मर्जीप्रमाणं वागलें तर मला स्वतंत्र अस्तित्वच रहाणार नाहीं.

**बाजीराव :** मी आल्यापासून हेंच सांगतो आहे—कीं माणसानं स्वतंत्रपणानं वागायला शिकलं पाहिजे. आतां तरी माझं म्हणणं पटलं ना तुला ?

**सुनंदा :** अगदीं पुरेपुर पटलं ! माझा नवरा मिळवता आहे. कुणाचा मिंधेपणा पतकरण्याची माझी तयारी नाहीं.

**बाजीराव :** अगदीं लाखांतला एक शब्द ! लाचारी काय म्हणून ? एक घाव आणि दोन तुकडे ! (विनायक येतो – शेवटचे शब्द त्याच्या कानावर पडतात.)

**विनायक :** दोन तुकडे ? म्हणजे पातळ खराब निघालं कीं काय ?

**सुनंदा :** पातळ चांगलं आहे – पण तुमच्या आईची मनःस्थिती बिघडली आहे – राग आला त्यांना.

**विनायक :** कां ?

**सुनंदा :** अगदीं भोळे सांब आहांत तुम्हीं. स्वतःच्या मतानं पातळ घेतलंत ना – तें आवडलं नाहीं त्यांना.

**विनायक :** काय म्हणत होती आई ?

**सुनंदा :** कळेलच तुम्हांला.

**बाजीराव :** मी सांगितलं असतं – पण तुमचा घरगुती विषय आहे हा – उगाच कशाला बोलूं ? माझ्यामुळं तुमचीं भांडणं व्हायला नकोत.

**सुनंदा :** तेंच बरं आहे बाबा. तुझ्यामुळं भांडणं झालीं असं नको व्हायला उद्यां.

**विनायक :** म्हणजे झालं तरी काय असं ?

**बाजीराव :** होणार काय ? या पातळ-प्रकरणामुळं तुमच्या घरांतील वातावरण गरमागरम झालंय. क्षुल्लक गोष्टीसाठीं उगाच तोंडातोंडी होणार.

**विनायक :** एवढीशी साधी बाब – त्यांत भांडण करण्यासारखं काय आहे ? स्वतंत्रपणानं एखादी वस्तु घेण्याचा अधिकार मला नाहीं का ?

**बाजीराव :** अधिकार कां नाहीं ? पण वरून सोज्वळ दिसणारीं तुमचीं ही माणसं तुमचा तो अधिकार मानणार नाहींत. माझ्यासमोर तुमचा अपमान झाला तर मला अतिशय वाईट वाटेल. त्यापेक्षां मी देतों पैसे –

**विनायक :** तूं पैसे देण्याची कांहींच अवश्यकता नाहीं. कुणीं विचारलं तर उत्तर द्यायला मी खंबीर आहे. (आंत जातो)

**बाजीराव :** (हंसून स्वगत) आग भडकत चालली. (उघड) ताई ! यावेळीं माघार घेऊं नकोस. (आंतून सगुणा येते)

**सगुणा :** अजून तूं बाहेरच उभी ? ती पोर एकटी मरते आहे तिला जरा मदत कर.

**सुनंदा :** आतांच तर बाहेरून आलें. कामं रोजचींच आहेत.

**सगुणा :** मला माहीत आहे तें. पण त्या पोरीला हातभार लावलास तर मोठेसे कष्ट पडणार नाहींत तुला.

**सुनंदा :** म्हणजे मी बसूनच असतें वाटतं ?

**सगुणा :** बसून असतेस कीं कामाच्या गाड्याला जुंपलेली असतेस तें तुझं तुला माहीत.

**सुनंदा :** ( रडत ) समजतात मला हीं सारीं बोलणीं. यांनीं पातळ घेतलं तें बरं नाहीं वाटलं तुम्हांला.

**बाजीराव :** ताई, गप्प रहाशील का आतां ?

**सगुणा :** मला ग कशाला वाईट वाटेल ? तुझ्या नवऱ्यानं तुला पातळ घेतलं त्याबद्दल मला आनंदच आहे. हिंडाफिरायचे तुमचे दिवस आहेत.

**सुनंदा :** तोंडदेखलीं बोलणीं समजतात मला. तुमचा कल आहे प्रभाकडे.

**सगुणा :** तुम्हीं दोघींही माझ्या सुना—मला दोघींही सारख्याच. सुनंदा, मला असलीं उलटीं उत्तरं खपणार नाहींत. बड्या बापाची लेक असलीस तर माहेरी—इथं माझी सून आहेस. माझ्या मनाप्रमाणंच तुला वागलं पाहिजे.

**सुनंदा :** मग घ्या हें पातळ आणि आग लावा त्याला !

**बाजीराव :** भांडा बाबा तुम्हीं. मी आपला खोलींत जाऊन बसतों.

**सुनंदा :** बघत काय राहिलांत ? बघवत नाहीं ना तुम्हांला ? मग राखरांगोळी करा त्याची.

**सगुणा :** या घराची लक्ष्मी तूं. भरल्या घरांत सुवासिनीचं लुगडं जाळायला सांगतेस मला !

**सुनंदा :** त्याशिवाय तुमचं मन शांत होणार नाहीं.

**सगुणा :** सुनंदा, फार बोललीस ! येऊं दे तुझा नवरा—त्यालाच याचा जाब विचारतें ! ( आंतून विनायक येतो. )

**विनायक :** जाब विचारण्याची कांहींच गरज नाहीं.

**सगुणा :** म्हणजे रे काय ?

**विनायक :** तुझं सारं बोलणं ऐकलं आहे मीं ! माझ्या मतानं पातळ घेतलं—त्यांत तुम्हांला एवढं वाईट कशाला वाटायला हवं ?

**सगुणा :** कुणाला वाईट वाटलं रे ?

**विनायक :** तुला ! " तूं कामाला हातभार लावत नाहींस – श्रीमंत असलीस तर माहेरीं – उलटीं उत्तरं मला खपणार नाहींत " हें काय उगीचंच ऐकवलंस सुनंदेला ?

**सगुणा :** बायकोचा कैवार घेऊन भांडायला आलास काय ?

**विनायक :** कैवार कसला ? तुझ्या अशा बोलण्यामुळंच मला हें बोलावं लागतंय.

**सगुणा :** मायमाऊली फजीत पावली आणि बायकोनं दुनिया दावली – असंच ना रे ? आईपेक्षां बायकोची किंमत तुला जास्त वाटते ?

**विनायक :** तुमच्या गुणामुळं तुम्हीं आपली किमत कमी करून घेत आहांत.

**सगुणा :** मी कवडीमोल झालें आणि बायको मोलाची ठरली – होय ना रे ?

**विनायक :** बस झालं ! माझं डोकं आणखी भडकवूं नकोस.

**सगुणा :** तुझं डोकं भडकायला लागलं काय ? तुझी बुद्धि नाहीं ही – बायकोनं आणि मेहुण्यानं टाळकं फिरवलं आहे तुझं.

**सुनंदा :** माझ्या भावावर भलताच आरोप केलेला मला सहन होणार नाहीं. बाजीराव – बाजीराव – ए ऽ बाजीराव ! ( बाजीराव येतो ) या भांडणाला तूं कारणीभूत आहेस असा तुझ्यावर आरोप आहे.

**बाजीराव :** छान ! बाजीरावावर बेतलं तर ? माझ्यावर जर असा आरोप असेल तर मीच निघून जातों. चल ताई, माझी निघण्याची तयारी कर.

**सगुणा :** थांब, इतक्यांत जाऊं नकोस. याचा सोक्षमोक्ष लागला पाहिजे. मुकुंदा – ए ऽ मुकुंदा ! ( प्रभा येते ).

**प्रभा :** काय आई ?

**सगुणा :** हे आणि मुकुंदा कुठं आहेत ?

**प्रभा :** चिकूच्या झाडार बांडगुळ धरलंय तें तोडताहेत.

**सगुणा :** जा – बोलावून आण त्या दोघांनाही. ( प्रभा जाते )

**विनायक :** येऊं दे नाना. मलाही त्यांना सांगायचं आहे.

**बाजीराव :** हो, असल्या गोष्टी समोरासमोर झालेल्या बऱ्या. मागाहून वादविवाद नको. ( नाना, मुकुंदा व प्रभा येतात )

**नाना :** कशाला बोलावलंस आम्हांला ?

**मुकुंदा :** एक बांडगुळ शिल्लक राहिलं होतं – कशाला बोलावलंस आई ?

**सगुणा :** तुझ्या दादाला विचार.

**मुकुंदा :** काय झालं रे दादा ? बोल्त कां नाहींस ? आतां सरळपणानं बोलणार कीं नाक दाबूं तुझं ? ( जवळ जातो )

**विनायक :** गप्प रहा मुकुंदा – नाना मला असलीं भांडणं खपणार नाहींत.

**नाना :** बाबा रे, तुम्हां मायलेकरांच्या भांडणांत मी कशाला पडूं ? तुमचं तुम्हींच निवारा.

**विनायक :** तें आतां शक्य नाहीं.

**नाना :** खरोखरच भांडलां आहांत कीं काय ? मग बोला – जास्त मोबदला देईल त्याचं वकीलपत्र घेईन. बोला – बोला लवकर.

**विनायक :** बोलूं ?

**नाना :** बोल ना –

**विनायक :** या घरांत जर अशीं भांडणं होणार असतील तर मला एकत्रित रहायचं नाहीं.

**नाना :** ( आश्चर्यानं स्तंभित होऊन ) एकत्रित रहायचं नाहीं ? म्हणजे ?

**सगुणा :** त्यानं आपल्या बायकोला पातळ आणलं त्याबद्दल विचारलं त्याच्या बायकोला – तर ती मला अद्वातद्वा बोलूं लागली आणि हा बायकोची बाजू घेऊन माझ्याबरोबर भांडायला आला.

**नाना :** होय का रे विनायक ?

**विनायक :** सुनंदाला विनाकारण बोललेलं मला आवडणार नाहीं.

**सगुणा :** आणि तिनं मला उलटीं उत्तरं दिलीं तर चालतील ना ?

**विनायक :** ती कधींच उलटीं उत्तरं देणार नाहीं. बड्या बापाची लेक म्हणून तूंच प्रत्येक वेळीं तिचा अपमान करतेस

**सगुणा :** माझ्यावर हा आरोप करतोस ? – आणि बोललें तर काय झालं ? दोघीही माझ्या सुनाच. बोलणारी मीच आणि मायेनं जवळ घेणारीही मीच.

**विनायक :** मग पातळ घेतलं म्हणून आकाशपाताळ एक कां करायचं ?

**सगुणा :** पातळ घेतलंस म्हणून मला वाईट वाटलं? अरे, प्रभालापण घ्यायचं होतं असं म्हटलं मीं. बायकोला घेतलंस आणि तिची आठवण नाहीं का?

**विनायक :** आतां कितीही सारवासारव केलीस तरी मला तें पटायचं नाहीं.

**नाना :** मग काय तुझ्या बायकोच्या पाया पडायचं?

**सगुणा :** त्याचा तोच विचार दिसतो आहे.

**विनायक :** आई, आतां जास्त बोलूं नकोस. नाहींतर–

**नाना :** काय करशील? तिच्या थोबाडांत देशील?

**विनायक :** तें आतांच सांगत नाहीं.

**नाना :** म्हणजे वेळ आली तर थोबाड फोडायला मागंपुढं पहाणार नाहींस असंच ना? तुला जन्म दिला–शिक्षण दिलं–दुःखाची झळ लागूं नये म्हणून आपल्या भावना मारल्या–या–या तुझ्या पाठच्या भावानं तुझं शिक्षण व्हावं म्हणून आपल्या शिक्षणाला रामराम ठोकला–विसरलास सारं? कर्ता झाल्याबरोबर आठवण बुझली तुझी?

**विनायक :** त्याचा मोबदला म्हणून सगळ्यांनींच माझ्यावर सत्ता गाजवावी?

**नाना :** झालं काय त्यांत? कुटुंबांतला कर्ता पुरुष सर्वांचा देणेदार असतो. मागची आठवण ठेवून त्यानं वागलं पाहिजे–आपलं मन आवरायला पाहिजे. त्याच्यावर सर्वांचाच अधिकार असतो–आणि म्हणूनच त्यानं आपलं मन मारून त्यागाला तयार असलं पाहिजे. कर्त्या पुरुषाचं तें कर्तव्य असतं. आमच्या त्यागाचं हेंच का मोल?

**विनायक :** त्यागाचा डांगोरा कशाला पिटतां? तुमचा स्वार्थीपणा मला चांगलाच समजतो.

**नाना :** मला स्वार्थी म्हणतोस?–बेशरम! (तोंडांत मारतात)

**मुकुंदा :** नाना–

**विनायक :** बजावलंत बापाचं कर्तव्य?

**सुनंदा :** कुटुंबांतील ऐक्यप्रेमाचा कैफ आतां तरी उतरला ना?

**नाना :** पहिलीवहिली लक्ष्मी म्हणून घरांत आलीस आणि अवदसा ठरलीस!

**विनायक :** नाना तोंड आवरा – माझ्या सहनशीलतेचा अंत बघू नका.

**मुकुंदा :** दादा, डोकं फिरलं कीं काय तुझं ?

**विनायक :** बाजूला हो मुकुंदा – गाजवूं दे त्यांना बापाचा अधिकार.

**सगुणा :** विनाऽऽयक........

**विनायक :** एक शब्ददेखील बोलूं नकोस. तुझा साळसूदपणा मला चांगला ठाऊक झाला. चल सुनंदा – आपल्याला ह्या कुटुंबांत रहायचं नाहीं. यांच्या नाकावर टिच्चून याच घरांत स्वतंत्र संसार थाटायचा. (खोलीत जायला निघतो)

**नाना :** बाहेर हो – बाहेर हो माझ्या घरांतून.

**विनायक :** कोण मला घरांतून बाहेर काढतो तेंच पहायचं आहे.

**नाना :** असं ! तर मग — ( पुढं होतात. त्यांना मुकुंद अडवतो )

**मुकुंदा :** नाना – नाना – माझं ऐका.

**सगुणा :** ( विनायकजवळ जाऊन ) विनायक माझं ऐक. माझा अधिकार विसरून मी तुझी क्षमा मागतें. भलताच अविचार करूं नकोस. विनायक – ( हात धरते )

**विनायक :** माझा निश्चय ठरला तो ठरला – हो बाजूला ! ( सगुणाला ढकलून आंत जातो. प्रभा सगुणाला सांवरते )

**प्रभा :** आई –

**नाना :** मुकुंदा – मुकुंदा – सोड रे मला –

**मुकुंदा :** शांत व्हा ! नाना – शांत व्हा !

[ नानांना आवरून धरत असतांना पडदा पडतो. ]

**अंक दुसरा समाप्त**

# ३

[ सजावट कायम. डाव्या बाजूच्या खोलींतून नाना प्रवेश करतात. त्यांच्या चेहऱ्यावर बराच बदल झालेला आहे. पाठीमागून सगुणा येते. ]

**सगुणा :** कुठं निघालांत आतां ?

**नाना :** जरा बाहेर जाऊन येतों.

**सगुणा :** आतां गेला नाहींत तर चालणार नाहीं का ?

**नाना :** तसं असतं तर मी कशाला बाहेर जायला निघालों असतों ? जी थोडीफार शेतीवाडी होती ती याचं शिक्षण व्हावं म्हणून गहाण ठेवली. पण हा निराळा होतांच सावकारांनीं तगादा लावला — " दे माय धरणी ठाय " करून सोडलं — तेव्हां तूंच म्हणालीस — शेतीवाडी विका आणि लोकांचं देणं द्या. आतां रहात्या घराखेरीज काय आहे शिल्लक ? जीव जगवण्यासाठीं शेवटपर्यंत धडपडणं हेंच आहे माझ्या नशिबीं.

**सगुणा :** आज चार महिने असंच चाललंय — शिवाय तुमची तब्येतही ठीक नाहीं.

**नाना :** माझ्या तब्येतीला काय धाड भरली आहे ? आणि आतां जगून तरी काय करायचं आहे ? विनायकाला शिक्षण देतांना मनांत केवढे मनोरे रचले होते — केवढीं सुखस्वप्नं पहात होतों — पण त्याचा काय उपयोग आहे ? असलं अपमानीत जिणं जगण्यापेक्षां या यातनांतून सुटलों असतों तर फार बरं झालं असतं.

**सगुणा :** उगाच कांहींतरी बोलूं नका. हे दिवस कांहीं रहाणार नाहींत.

**नाना :** ज्या दिवसांच्या आशेवर जगलों ते दिवस आतां कधींही येणार नाहींत. आजपर्यंत मानानं जगलों — उण्या बोलानं कुणाला दुखवलं नाहीं — सर्वांच्या अडीअडचणी जाणल्या — त्याचं हेंच का फळ ?

**सगुणा :** चांगल्या गोष्टी कधीं वाया जात नाहींत. पूर्वींचे दिवस पुन्हां परत येतील.

**नाना :** एखाद्या लहान पोराप्रमाणं माझी समजूत काय करतेस ? ज्याच्याबद्दल मोठ्या अपेक्षा बाळगल्या – कष्टांची, हालांची कधीं पर्वा केली नाहीं – तोच आमच्यावर उलटला. लोकांचे संसार मीं जोडले – पण माझ्याच मुलानं घरांतल्या घरांत दोन चुली निर्माण केल्या. कसं सहन होईल मला ?

**सगुणा :** तो आपलं कर्तव्य विसरला म्हणून आपण का आपला तोल सोडायचा ? आज उद्यां त्यालाही पटेल – पुन्हां मार्गावर येईल.

**नाना :** ज्यानं जाणूनबुजून हा मार्ग स्वीकारला तो कसला मार्गावर येणार ? मूर्ख असता तर चार थोबाडांत देऊन सुधारता आला असता – पण हा शिकूनसवरून शहाणा झाला – मोठ्या योग्यतेला चढला – तो असा नाहीं तर कसा वागणार. विनायक परत मार्गावर येईल याच आशेवर जगणार असशील तर मरणापर्यंत वाट पहावी लागेल.

**सगुणा :** तुम्हीं जा बाहेर – आणि लवकर घरीं परत या. मला मारायचा विचार केला आहांत सर्वांनीं. मुकुंदा धडपणें जेवत नाहीं – ती पोर सर्वांकडे पाहून झुरत असते. कुणी कुणाला सांवरायचं आणि धीर द्यायचा ?

**नाना :** देहांतला प्राण निघून गेल्यावर मढ्याला काय सांवरायचं ?

**सगुणा :** तुम्हीं सर्वांना सांवरायचं ते अशी भाषा बोलायला लागलांत – मग मीं कुणाच्या धीरावर जगूं ? मला किती दुःख सहन करावं लागत असेल याची कल्पना तरी तुम्हांला आहे का ?

**नाना :** मला सारं कांहीं माहीत आहे – पण समजत असून उमजत नाहीं त्याला मी काय करूं ? गांवांत कुठं तोंड दाखवूं नये असं वाटतं !

**सगुणा :** कुठल्याही कुटुंबांत असं झालं नसेल का ?–तसंच आपण मानायचं.

**नाना :** कोणत्याही दुःखांत जर समाधान मानून जगतां येत असतं तर जगांतला प्रत्येक माणूस सुखी झालेला दिसला असता. माझ्या मनस्तापाची कल्पना तुला कधींच येणार नाहीं.

**सगुणा :** मी काय माणूस नाहीं – कीं मला हृदय नाहीं ? तुमच्याइतकंच मलाही दुःख झालंय – पण तुम्हां सर्वांना सुखी ठेवण्यासाठीं – हा कुटुंबाचा

गाडा सांवरण्यासाठीं हंसऱ्या तोंडानं वावरतें आहे. माझं मरण डोळे उघडे ठेवून मी पहातें आहे.

**नाना :** आणि तुझ्यासाठींच मी उभा आहें. मुकुंदाकडं पाहिलंस ?—त्या पोराची काय दशा झाली आहे ती ?

**सगुणा :** आई आहे मी. माझ्या नजरेंतून कसं सुटेल ? त्याला धीर देण्याऐवजीं तोच मला धीर देत होता. काल म्हणत होता—आई, नानांना तूं समजावून सांग—विनायकदादा जरी आम्हांला विसरला असला तरी मोलमजुरी करून तुम्हांला पोशीन. घाबरूं नका तुम्हीं.

**नाना :** त्याला म्हणावं, तूंच आयुष्यभर सुखी रहा. आम्हीं पिकलीं पानं—थोडे दिवस उरले आहेत आमचे. हें बघ—त्याच्याकडं लक्ष दे. अगदींच खंगला आहे तो. सारखा विचार करीत असतो.

**सगुणा :** त्याच्याबद्दल सांगतां आणि तुम्हीं तेंच करतां. पहिल्यांदा तुम्हीं विचार करायचं सोडून द्या ! कांही झालंच नाहीं असं समजून वागा म्हणजे सारं कांहीं ठीक होईल.

**नाना :** पहातों प्रयत्न करून—जमलं तर जमलं ( असं स्वतःशींच बडबडत बाहेर जातात )

**सगुणा :** मी यांना धीर दिला—पण माझाच धीर खचत चालला आहे. कसा चालायचा हा संसार ? आम्हीं सगळ्यांच्या उपयोगीं पडलों पण पडल्याप्रसंगीं मात्र कुणीच नाहीं. सारेजण हंसायला मात्र आहेत. ( बाहेरून प्रभा येते ) काय ग मिळाले का तांदूळ ?

**प्रभा :** नाहीं आई ! उलट काकू काय म्हणाल्या ठाऊक आहे ?

**सगुणा :** काय म्हणाली ती ?

**प्रभा :** कुबेर असला तरी तुम्हांला पुरणार नाहीं. माझ्याकडे काय तांदुळाच्या गोण्णीं भरल्या आहेत ? घरांतून निघतां तें थेट माझ्याकडे येतां. नको तुमचा शेजार असं झालंय् मला.

**सगुणा :** बरं—बरं—यापुढं येणार नाहीं तुमच्याकडे. मागची आठवण विसरली वाटतं इतक्यांत ? आम्हांला न ठेवतां वेळप्रसंगीं धान्य दिलं आहे तिला. सुखाच्या वेळीं सगळे जमतात—संकटाचा भार ज्याचा त्यानं सहन केला पाहिजे.

आपलं नशीब सरळ असतं—पोरानं ससाराचा बाजार केला नसता—तर कशाला दुसऱ्याच्या दारीं जावं लागलं असतं—आणि उणींदुणीं उत्तरं ऐकावीं लागलीं असतीं ?

**प्रभा :** कशाला उगाच वाईट वाटून घेतां ? भाकऱ्या भाजल्या आहेत—जाईल आतांची वेळ.

**सगुणा :** पुन्हां संध्याकाळीं येरे माझ्या मागल्या ! थांब हं—मी जाऊन येतें भिमामावशीकडून.

**प्रभा :** आतां कशाला ?

**सगुणा :** माझ्या कर्मांची कथा सांगायला. तेवढाच भार हलका होईल. ( बाहेर जाते )

**प्रभा :** प्रत्येकजण आपापल्या परीनं दुसऱ्याला धीर देण्याचा प्रयत्न करीत आहे. जिथं दिवसभर आनंदी वातावरण असायचं तिथं होतं नव्हतं तेवढं दुःख भरलंय. अशा बिकट प्रसंगीं संसाराचा गाडा मलाच सांवरायला हवा.

( **राग**—यमनकल्याण : **ताल**—दादरा )

एकमेका सांवराया
उभी मी माझ्या संसारीं ॥ धृ० ॥
सुखदु:खाचे पराजयाचे
घाव झेलण्या शिरीं
कधीं तरी येईल दिन भाग्याचा
त्या मंगल क्षणीं वैभव शिखरीं ॥ १ ॥

[ गाणं संपतं इतक्यांत बाहेरून मुकुंदा येतो. ]

**मुकुंदा :** प्रभा—

**प्रभा :** काय ?

**मुकुंदा :** असा गोरामोरा चेहरा कां झाला तुझा ! रडत होतीस कीं काय ?

**प्रभा :** रडत रहायला मला काय कमी आहे ?

**मुकुंदा :** तसं कुठं म्हटलं मीं? आमच्या या घरांत सगळ्या गोष्टींची आबादी-आबाद आहे. दागदागिन्यानं भरलेल्या तिजोऱ्या – कपड्यालत्त्यांनीं भरलेल्या पेट्या – धान्याच्या राशी –

**प्रभा :** हें असलं म्हणजेच आनंदी रहायचं वाटतं? तुमच्यासारखीं प्रेमळ माणसं दुसरीं कुठं सांपडतील का? तुमचं तर किती प्रेम आहे माझ्यावर? –

**मुकुंदा :** माझ्या प्रेमाचं मोजमाप ब्रह्मदेवाच्या बापालादेखील होणार नाहीं – म्हणूनच फाटकं लुगडं नेसून कुटुंबाच्या रगाड्याखालीं मरते आहेस.

**प्रभा :** माझ्या घरीं मी सुखांत आहे. कधीं नव्हतें इतकी समाधानी आहे.

**मुकुंदा :** नुसत्या समाधानावर जगतां येत नाहीं.

**प्रभा :** आणि गडगंज संपत्ति असूनही सुख लाभत नाहीं.

**मुकुंदा :** प्रभा, माझं ऐकशील जरा?

**प्रभा :** सांगा ना –

**मुकुंदा :** एक महिनाभर माहेरीं जातेस?

**प्रभा :** कशाला? –

**मुकुंदा :** मन शांत करायला.

**प्रभा :** मन शात करायला कीं सुखानं चार घांस खायला?

**मुकुंदा :** प्रभा –

**प्रभा :** सुखाच्या वेळीं माहेरीं मानानं जायचं असतं – असल्या वेळीं नव्हे. तुम्हांला अशा स्थितींत सोडून माहेरीं सुखानं रहायला जाऊं मी? ज्या दिवशीं मी या घरांत आलें त्याच दिवशीं माझं माहेर संपलं!

**मुकुंदा :** तशा अर्थानं म्हटलं नव्हतं मीं – विश्रांति म्हणून!

**प्रभा :** विश्रांती मला नको – तुम्हांलाच हवी आहे.

**मुकुंदा :** मग असं करूं या – आपण दोघंही जाऊं! महिनाभर पाहुणचार झोडूं. खायचं प्यायचं आणि झोंपा काढायच्या!

**प्रभा :** माझं मन पहातां काय?

**मुकुंदा :** म्हणजे?

**प्रभा :** तुम्हांला सारं माहीत आहे. हें बघा, प्रभा मोठ्या दिलाची आहे. उपाशी पोटीं आपल्या घरीं राहील—नाक मुठींत धरून माहेरीं जाणार नाहीं.

**मुकुंदा :** नाक मुठींत धरून कशाला ?—एकमेकांचा हात धरून जाऊं या अगदीं जोड्यानं.

**प्रभा :** जोड्यानं माहेरीं जाण्यापेक्षां पायांत खोडा घालून या घरांतच ठेवीन तुम्हांला.

**मुकुंदा :** माहेरीं जा म्हटलं म्हणून इतकी भयंकर शिक्षा ?

**प्रभा :** याहीपेक्षां कडक हवी. त्याशिवाय सासुरवाडीला जाण्याचं खूळ तुमच्या डोक्यांतून जाणार नाहीं.

**मुकुंदा :** माणूस परिस्थितीनं गांजला म्हणजे जगाच्या बाजारांत वेडा ठरतो. केवळ तुझं मन पहावं म्हणूनच मी असा बोललों. तुझ्याबद्दल खात्री आहे मला.

**प्रभा :** मग आडवळणाची भाषा कशाला ?

**मुकुंदा :** केवळ मजा म्हणून ! रडत रहाण्यापेक्षां हंसत रहाणं मला अधिक आवडतं. प्रभा, मी आशावादी माणूस आहे. प्रतिकूल परिस्थितींतूनच माणसाला मार्ग काढतां आला पाहिजे. संकटानं आपल्यावर मात करण्यापेक्षां आपण संकटावर मात केली पाहिजे.

**प्रभा :** पण नानांना कुणी समजावून सांगायचं ? त्यांनीं तर अंथरुण धरण्याची पाळी आली आहे.

**मुकुंदा :** तोच तर बिकट प्रश्न आहे. आजपर्यंत मानमरातबानं त्यांनीं या गांवांत दिवस काढले—विनायकदादाच्या आशेवर कित्येक आपत्तींशीं तोंड दिलं—पण विनायकदादाला त्याचा विसर पडला.

**प्रभा :** त्या बाजीरावानं आमचं घर फोडलं ! या सगळ्या गोष्टीला तोच कारणीभूत आहे.

**मुकुंदा :** त्याला दोष देण्यांत काय अर्थ आहे ! त्यानं काय वाटेल तें सांगितलं असेल—पण विनायकदादाचं शहाणपण कुठं गेलं ? तो असं वागेल असं स्वप्नांतदेखील मला वाटलं नव्हतं. दादा सरळ असता तर लोकांची उणं-अधिक बोलायची काय छाती होती ?

**प्रभा :** म्हणजे काय झालं ?

**मुकुंदा :** त्या प्रकाराची पुन्हां आठवण नको.

**प्रभा :** स्पष्टपणानं सांगा ना काय तें !

**मुकुंदा :** तुला फार वाईट वाटेल.

**प्रभा :** मला ऐकण्याची संवय झाली आहे.

**मुकुंदा :** रात्रीं नानांनीं सांगितलं होतं कीं विसूकाकांकडून पन्नास रुपये मागून आण. त्यांनीं पैसे दिले नाहींतच—पण त्यांचं व्याख्यान मात्र ऐकावं लागलं.

**प्रभा :** काय म्हणाले ते ?

**मुकुंदा :** म्हणे तुमच्या असल्या करणीनं विनायक तुमच्यापासून विभक्त झाला. त्यानं कमवायचं आणि तुम्हीं त्याच्या कमाईचं दिवाळं वाजवायचं. शेवटीं भीक मागायची पाळी यायची !

**प्रभा :** तुम्हीं झणझणीत उत्तर द्यायचं.

**मुकुंदा :** माझंही पित्त खवळलं ! मीं त्याला सांगितलं कीं तुझ्या घरावर जसी आली होती तेव्हां नाना जामीन राहिले म्हणूनच अब्रुसकट बचावलास—नाहींतर एव्हांना भिकेचा कटोरा घेऊन दारोदार फिरला असतास. तुझ्या दैवानं तुला हात दिला—तुला चांगले दिवस आले म्हणूनच आम्हांला गोष्टी शिकवायला लागलास.

**प्रभा :** आणि मग ?

**मुकुंदा :** मग काय ? त्यानं जवळजवळ मला हांकलूनच दिलं—त्याचा गळा दाबून तिथल्यातिथंच जीव घ्यावा इतका त्वेष आला होता मला.

**प्रभा :** पण तुम्हीं त्याच्याकडे गेलां नसतां तर ?—

**मुकुंदा :** प्रभा, गरिबीनं लाचार झालेल्या माणसाला मानापमानाची जाणीव नसते. जिथं आशा दिसेल तिथं तो धांव घेतो. पण शेवटीं अपमानाची ठोकर खाऊन परत येतो.

**प्रभा :** हे दिवस संपणार तरी केव्हां ?

**मुकुंदा :** त्याच खटपटींत आहे !

**प्रभा :** म्हणजे ?—

**मुकुंदा :** आज सव्वा रुपया कमावून आणला आहे मीं–पांडू खोताचा वाडीवरचा मळा नांगरून दिला.

**प्रभा :** म्हणजे पहिल्यावहिल्यानं दुसऱ्याच्या दारीं आज हमाली केलीत तर ?

**मुकुंदा :** हो हमाली केली–पण मोठ्या मानानं. काम केलं आणि पैसे घेतले. कुणाजवळ भीक मागितली नाहीं आणि यापुढं कुणाच्या दारीं जाणार नाहीं. विनायकदादानं जरी आमच्याकडं पाठ फिरवली असली तरी लोकांच्या दारीं मोलमजुरी करीन पण तुम्हांला जगवीन. स्वतःच्या कष्टाची भाजीभाकरी खाण्यांत किती आनंद सांठवलेला असतो तें आज समजलं. रडूं नकोस. मान ताठ करून मानानं जगायचं. यापुढं रडणं बंद !

**प्रभा :** कुठं रडते आहे मी ?

**मुकुंदा :** वेडे, हे दिवस रहाणार आहेत थोडेच ? कायम कामासाठीं वणवण फिरतो आहे–पण अजून कांहीं जमत नाहीं. बाहेर कुठं जायचं म्हटलं तर नाना आजारी–शिवाय त्यांची मला बाहेर पाठवण्याचीही तयारी नाहीं.

**प्रभा :** चला बघूं ! भाकर खाऊन घ्या–मग बोलूं सावकाश ! चला...

(जायला निघतात इतक्यांत विश्वनाथ येतो)

**विश्वनाथ :** मुकुंदा–

**मुकुंदा :** कोण विश्वनाथ ! बऱ्याच दिवसांनीं आलास. गेले आठ दिवस होतास कुठं ?

**विश्वनाथ :** एका कामासाठीं आठ दिवस बाहेरगांवीं गेलों होतो. कसं काय ठीक चाललं आहे ना ? नाना–काकू कुठं आहेत ?

**मुकुंदा :** बाहेर गेलीं आहेत !

**विश्वनाथ :** काय वहिनी, बरं आहे ना ?

**प्रभा :** अगदीं मजेंत–मी जाते हं घरांत. (जाते)

**विश्वनाथ :** मुकुंदा, तूं गप्प कां ? काय झालं रे ?

**मुकुंदा :** कुठं काय ? कांहीं नाहीं.

**विश्वनाथ :** माझ्याजवळ खोटं बोलतोस का ? खरं काय तें सांग ना !

**मुकुंदा :** खरं सांगूं ? सारं तुला ठाऊक आहेच. उगाच दुःखी मात्र होशील ! तूं तरी आम्हांला किती मदत करणार ?

**विश्वनाथ :** मला समजलंय सारं! नाना—काकू कशासाठीं बाहेर गेलीं आहेत?

**मुकुंदा :** कुणी कुणाला विचारण्याच्या मनःस्थितींत नाहीं. प्रत्येकजण आपआपल्या परीनं दुःखी आहेत—मार्ग काढण्याचा प्रयत्न करीत आहेत.

**विश्वनाथ :** विनायक सध्यां कुठं असतो?

**मुकुंदा :** चार दिवस रजेवर आलाय तो. आतां कुठं बाहेर गेला आहे वाटतं.

**विश्वनाथ :** आणि बाजीराव?

**मुकुंदा :** नांवाप्रमाणं बाजीराव आहे तो. मेहुणा आहे—हक्कानं जेवतो आहे त्याच्याकडं.

**विश्वनाथ :** त्यानंच हें भरलं घर फोडून सुखी संसाराची वाताहात लावली.

**मुकुंदा :** जाऊं दे रे. आपलं कर्म—दुसरं काय?

**विश्वनाथ :** कसलं आलं आहे कर्म? बाजीरावासारख्या बाजारबुणग्यांचं वर्म बाहेर काढलं पाहिजे.

**मुकुंदा :** (विषय बदलून) तूं भाकर खाणार का?

**विश्वनाथ :** तूं खाऊन घे. मी बसतों इथं.

**मुकुंदा :** आंत चल ना.

**विश्वनाथ :** बाहेर बसतों—विनायक आला कीं त्याला जाब विचारायचा आहे.

**मुकुंदा :** उगाच भांडण कशाला?

**विश्वनाथ :** तूं जा पाहूं. माझं मी पाहून घेईन. (मुकुंदा आंत जातो) माणूस एकदां कर्तबगार झाला म्हणजे मागचे दिवस विसरतो. (इतक्यांत बाहेरून बाजीराव येतो.)

**बाजीराव :** कोण कुणाला विसरलं?

**विश्वनाथ :** या—या बाजीराव, काय म्हणतेय तुमची तब्येत?

**बाजीराव :** मी आजारी असल्याचं समजलं होतं तुम्हांला?

**विश्वनाथ :** फुकटचं आणि गरमागरम खाणारा आजारी कसा पडेल?

**बाजीराव :** तुम्हीं पोसतां वाटतं मला? माझ्या मेहुण्याकडे आहे मी.

**विश्वनाथ :** कुठून आला तुझा मेहुणा? त्याचं आयुष्य कर्तबगार करण्यासाठीं ज्यांनीं हाडांचीं काडं केलीं ते उपाशी मरताहेत आणि तुझ्यासारखे पोळ खुशाल चरताहेत!

**बाजीराव :** विश्वनाथ, जीभ लांबली तुझी!

**विश्वनाथ :** माझी बेताचीच आहे. तुझी जीभ लांबली म्हणूनच ना भरल्या घराची वाताहात झाली – आणि तुझ्यासारख्या पोटभरूंची पोळी पिकली!

**बाजीराव :** जरा मर्यादा ठेवून बोल – मलाही असली भाषा बोलतां येते. सणसणीत टोला मिळाल्याबरोबर बत्तीशी घशांत जाईल.

**विश्वनाथ :** त्या अगोदर तुझी राहील का जागेवर? फुकटचं खातो आहेस आणि घमेंड केवढी!

**बाजीराव :** तुझ्या बापाचे चार चव्वल खर्च होत नाहींत ना?

**विश्वनाथ :** तेवढी तुझी लायकी नाहीं. म्हणे माझ्या मेहुण्याकडे आहे. आतां तुला मेहुणा दिसला. इतके दिवस कुठं होतास? त्याला मोठा करण्यासाठीं – कुटुंबांतील माणसांना किती अपमान सोसावा लागला – लोकांचे उंबरठे झिजवावे लागले याची जाणीव तरी आहे का तुला?

**बाजीराव :** त्याच्या आईबापाच्या कर्तव्याचं ढोलकं गळ्यांत घालून डांगोरा पिटणारा तूं कोण?

**विश्वनाथ :** मी कोण? त्यांच्या सुखदुःखांत सामील होणारा – माणसाचं काळीज घेऊन फिरणारा माणूस आहे. तुझ्यासारखा उलट्या काळजाचा नाहीं.

**बाजीराव :** सगळ्यांचीं काळजं सारखींच असतात. मला काय करायचं आहे तें मी करतों. मैत्रीच्या नांवाखालीं तुझ्यासारखे प्रेमाचे खेळ खेळणं मला जमणार नाहीं.

**विश्वनाथ :** म्हणजे? –

**बाजीराव :** एवढं दचकण्याचं कारण नाहीं. प्रभाचे आणि तुझे संबंध कोणत्या प्रकारचे आहेत?

**विश्वनाथ :** माझी बहीण मानतो मी तिला.

**बाजीराव :** मानणं आणि प्रत्यक्ष बहीण असणं यांत फरक आहे. असल्या

नकली नात्याच्या नांवाखालीं जगांतलीं बरींच पापकृत्यें बिनबोभाट पचवतां येतात – माहित आहे मला.

**विश्वनाथ :** बाजीराव ! –

**बाजीराव :** वर्मी घाव बसला वाटतं ? तुम्हीं प्रीतीची दिवाळी साजरी केलीत तरी तुमच्या नांवानं शिमगा करण्याचं मला कांहींच कारण नाहीं. तूं माझ्यावर नसते आरोप केलेस म्हणून तुझं रूप तुला दाखवावं लागलं.

**विश्वनाथ :** आपली काळी करणी लपविण्यासाठीं माझ्यावर असला घाणेरडा आरोप करतोस काय ? बाजीराव, जगांतलीं सगळींच माणसं तुझ्यासारखीं नालायक नाहींत. नीति-अनीतीची प्रत्येकाला चाड असतेच.

**बाजीराव :** मलाही माहित आहे. आजच्या जगांत आपल्या पापावर पांघरूण घालण्यासाठीं फक्त नीति-अनीतीच्या बुरख्याची जरुरी आहे. त्यामुळं इतरांची दिशाभूल करून आपलं काम साधतां येतं. जा – तुझ्या त्या शेळपट मित्राला – मुकुंदाला मैत्रीचं अमृत पाज – मला नको.

**विश्वनाथ :** ज्याचे हात पापाच्या चिखलानं कोंपरापर्यंत बरबटले आहेत त्याला सर्व जागीं पापच दिसायचं !

**बाजीराव :** तूं जर एवढा नीतीमत्तेचा पुतळा आहेस तर रागवायचं काय कारण ? आणि माझ्या नांवामागं एवढीं बिशेषणं कशाला लावतोस ?

**विश्वनाथ :** मी प्रामाणिक असतांना असल्या आरोपाला काडीइतकीही किंमत देत नाहीं. तुझ्यामागं विशेषणं लावण्याचं कारण इतकंच कीं त्याशिवाय तुझं खरं स्वरूप जगाला दिसणार नाहीं. प्रभाच्या आणि माझ्या बंधू-भगिनी-प्रेमाची प्रभा तुझ्या विषारी बोलांनीं कधींच हिणकस ठरणार नाहीं. उलट शंभर नंबरी सोन्याप्रमाणं उजळून निघेल. चल नीघ माझ्या नजरेसमोरून.

**बाजीराव :** हें तुझं घर नाहीं.

**विश्वनाथ :** तुझ्या दृष्टीनं परका असलों तरी माझ्या दृष्टीनं हें माझंच घर आहे – तुझ्या बापाचं खास नाहीं.

[ विनायक येतो. शेवटचे शब्द त्याच्या कानावर पडतात. ]

**विनायक :** त्याच्या बापाचं नसलं तरी माझ्या बापाचं आहे ना ? तूं कोण त्याला असं बोलणारा ?

**विश्वनाथ :** विनायक, तूंच का हें बोलतो आहेस ?

**विनायक :** हो–हो. मीच बोलतों आहे. काय म्हणणं आहे तुझं ?

**विश्वनाथ :** इतकी बुद्धि फिरली तुझी ?

**विनायक :** त्याला तुम्हींच कारणीभूत आहांत.

**विश्वनाथ :** काय केलं मीं तुझं ?

**विनायक :** आमच्या घरगुती भांडणाचा डांगोरा गांवभर तूंच पिटतो आहेस ना !

**विश्वनाथ :** माझ्यावर हा आरोप करतोस ?

**बाजीराव :** ( मधेंच विश्वनाथकडे बोट दाखवून ) मघांपासून माझ्यावरसुद्धां हा तूंच हें घर फोडलंस असा आरोप करीत आहे.

**विनायक :** विश्वनाथ, तुला यापुढं इथं यायचं असेल तर आमच्या खासगी भानगडींत न पडण्याची तुला खबरदारी घेतली पाहिजे. नाहींतर–

**विश्वनाथ :** घरांतून हांकलून देशील असंच ना ?

**विनायक :** शेवटीं त्याच मार्गाचा अवलंब करावा लागेल.

**विश्वनाथ :** आजपर्यंतच्या मैत्रीचं हेंच का फळ ?

**विनायक :** तुझ्या मैत्रीशीं मी प्रतारणा केलेली नाहीं–पण त्याचा तूं भलताच फायदा घेऊं पहातो आहेस.

**विश्वनाथ :** अस कोणतं नुकसान केलं मीं ? सांग ना !

**बाजीराव :** प्रत्यक्ष नुकसान कशाला करायला हवं ? विनायकानं कुटुंबाची उपासमार चालविली आहे असा प्रचार तूंच चालविला आहेस ना ?

**विश्वनाथ :** तुझ्याजवळ पुरावा आहे का ?

**बाजीराव :** पुराव्याशिवाय मी बोलणार नाहीं. बाजीरावाचा शब्द म्हणजे शब्द !

**विश्वनाथ :** तुझी काय लायकी आहे तें मला ठाऊक आहे.

**विनायक :** बाजीरावाच्या लायकीपेक्षां तुझी काय लायकी आहे याची मला चांगलीच ओळख पटली.

**विश्वनाथ :** कुणाच्या ?–मेहुण्याच्या बोलण्यावरून ?–

**विनायक :** मी ऐकलंय त्याच्यावरून. प्रत्येकाला सांगतो आहेस विनायक बाईलवेडा झाला म्हणून. तिच्या नादानं बापावर हात उगारला–घरांत दोन भिंती घातल्या.

**विश्वनाथ :** असं मी कुणाजवळ बोललों नाहीं–तरी पण लोक बोलतात त्यांत काय खोटं आहे ?

**विनायक :** छान ! आजपर्यंतच्या मैत्रीचं चांगलं ऋण फेडतो आहेस.

**बाजीराव :** करून सवरून नामानिराळा.

**विनायक :** बाजीराव, तूं आंत जा पाहूं–उत्तरं द्यायला मी खंबीर आहे.

(बाजीराव आंत जातो)

**विश्वनाथ :** त्याला कशाला आंत पाठवलंस ? तुझ्या कर्तबगारीचा पाढा त्याच्यासमोरच वाचायचा होता !

**विनायक :** मोठे उपकार केले आहेस माझ्यावर ते माहित आहे मला. तेच सांगणार होतास ना ?

**विश्वनाथ :** उपकाराची भाषा माझ्या तोंडून कधींच निघालेली नाहीं आणि मी त्याचा कधीं उच्चारही केला नसता–पण ओघाला आलं म्हणून आठवण करून देतों. तूं कॉलेजच्या फीसाठीं अडलास–नाना माझ्या घरीं आले–तेव्हां घरांत आलेलं पीक विकून तुझ्या फीची भर केली आहे–आठवण आहे तुला ?

**विनायक :** चांगली आठवण आहे !

**विश्वनाथ :** तेव्हां माझ्या गळ्यांत गळा घालून रडलास आणि म्हणालास– तुझ्या या उपकाराची फेड मला या जन्मीं करतां येणार नाहीं. मी पण रडलों त्यावेळीं ! तूं कॉलेजची परीक्षा पास झालास त्यावेळीं मीं मारलेली मिठी आठवते तुला ?

**विनायक :** त्यावेळचा विश्वनाथ आणि आतांचा विश्वनाथ यांत फरक पडला आहे.

**विश्वनाथ :** तुझ्या दृष्टीनं–माझ्या नव्हे. आहे तसाच आहे मी. आणि म्हणूनच तुझ्या आईवडिलांची होणारी ओढाताण माझ्यानं पहावत नाहीं. आंतड्याला पीळ पडतो माझ्या !

**विनायक :** त्यांच्या करणीचं त्यांना योग्य बक्षीस मिळालं.

**विश्वनाथ :** काय चुकलं त्यांचं ?

**विनायक :** मरमर मरायचं आणि यांचं बोलणं ऐकून घ्यायचं.

**विश्वनाथ :** कोण कधीं बोललं तुला ? नाना कधीं बोलले का ? काकूनं एका शब्दानं दुखवलं नाहीं तुला. त्या माऊलीची काय दशा झाली आहे तें डोळे उघडे ठेवून पाहिलं आहेस का ? तुझ्या आशेवर आजवर जगलीं तीं. तुझा नांवलौकिक वाढून मोठा व्हावास अशी इच्छा त्यांची. तूं त्यांच्या मरणाला कारणीभूत होतो आहेस.

**विनायक :** म्हणणं काय तुझं ?

**विश्वनाथ :** माझं म्हणणं काय असणार ? पुन्हां भरलं घर आनंदी दिसूं दे.

**विनायक :** तें आतां शक्य नाहीं. माझा निश्चय कधींही बदलणार नाहीं— आणि तुला हेंच सांगायचं असेल तर पुन्हां या घरांत पाऊल ठेवूं नकोस.

**विश्वनाथ :** विनायक......( मुकुंदा येतो ) आलास ? ये. नानांना – काकूला सांग – विश्वनाथ आजपासून या घरांत येणार नाहीं.

**मुकुंदा :** म्हणजे ?

**विश्वनाथ :** तुझ्या दादाचं सांगणं आहे तसं !

**मुकुंदा :** पण — आमच्यासाठीं —

**विनायक :** माझं सांगणं आहे—चालता हो माझ्या घरांतून. मला अक्कल शिकवायला आला आहे !

**विश्वनाथ :** ठीक आहे. ही उसनी अक्कल फार दिवस टिकणार नाहीं. मुकुंदा, जातों मी.

**मुकुंदा :** असं रे काय विश्वनाथ ?

**विश्वनाथ :** पुन्हां या घरांत पाऊल टाकणार नाहीं. ( विश्वनाथ, विश्वनाथ— अशा हाका मारीत मुकुंदा जातो. विनायक खिन्नपणें पहातो. )

**विनायक :** माझं चुकतं आहे कीं बरोबर आहे ? कोण याचं उत्तर देईल ? दुःखाचा गडद अंधार माझ्याभोंवतीं पसरला आहे.

[ राग – शंकरा : ताल – त्रिताल ]

दाटला अंधकार मज भंवतीं
मायबंध माझे तुटती ॥ धृ० ॥
नच उरला मज त्राता
आप्तजनांना होइ पारखा
छळिते मजला दैवगती ॥ १ ॥

[ विनायक खिन्नपणानं बसतो. इतक्यांत बाहेरून सुनंदा येते. ]

**सुनंदा :** खिन्नपणानं कां बसलां आहांत ?

**विनायक :** सहज !

**सुनंदा :** खोटंच ! तुमचा चेहरा सांगतो आहे. काय झालं ?

**विनायक :** कांहीं नाहीं !

**सुनंदा :** तरी पण –

**विनायक :** कांहींच झालेलं नाहीं – आणि विचारायच्या भानगडींत पडूं नकोस. मला जरा शांत होऊं दे. ( एकदम आंत निघून जातो. )

**सुनंदा :** कांहीं तरी बिनसलं आहे खास. ( आंतून बाजीराव येतो ) काय झालं रे बाजीराव ?

**बाजीराव :** काय व्हायचं ? तो एक शहाणा आला होता ना ?

**सुनंदा :** कुठला शहाणा ?

**बाजीराव :** तो विश्वनाथ. मला अक्कल शिकवायला लागला. चांगला चापला आहे त्याला.

**सुनंदा :** हे केव्हां आले ?

**बाजीराव :** त्याचं माझं भांडण सुरू असते वेळींच. त्याचा आणि विनायकचाही बराच वादविवाद झाला.

**सुनंदा :** मग ?

**बाजीराव :** मी आपला खोलींत जाऊन बसलों तरी कान इकडे होतेच ! शेवटीं विनायकानं हांकलून दिलं त्याला. त्याच्या पाठोपाठ तो मुकुंदा बोंबलत गेला –

**सुनंदा :** कशाला ?

**बाजीराव :** आपल्या दोस्ताची समजूत घालायला.

**सुनंदा :** ठीक झालं ! असंच व्हायला पाहिजे.

**बाजीराव :** सांभाळ हं ! याच वेळीं विनायकाला सांवरायला पाहिजे – नाहींतर गाडं उलटं व्हायचं !

**सुनंदा :** तें कसं काय ?

**बाजीराव :** कारण त्यानंतर तो अगदीं खिन्नपणानं बसला होता. मन झुकायचं त्याचं – जातो मी आंत – नाहींतर संशय यायचा आमच्या खलबताचा.
(बाजीराव आंत जातो)

**सुनंदा :** ठीक आहे. कुणी कितीही प्रयत्न केला तरी मी खंबीर आहे – पण जर यांच्यांत बदल झाला तर साऱ्यांच्या दृष्टीनं मीच दोषी ठरणार आणि शेवटपर्यंत या कुटुंबांत मरावं लागणार !

[**राग** – मिश्र भैरवी : **ताल** – केरवा]

समय बिकट अजि आला
भाग्य माझें नाशायाला ॥ धृ० ॥
स्वप्न रचिलें मीं तें सुंदर
उभाराया भव्य मंदीर
भाग्य रविवरी पडतां घाला ॥ १ ॥

[सुनंदा आंत जाते – थोड्या वेळानं बाजीराव आंतून येतो.]

**बाजीराव :** नवराबायको समजूत करूं दे एकमेकांची. ठीक होईल सारं. (आंतून प्रभा येते – बाजीरावाला पाहिल्याबरोबर आंत जाऊं लागते) प्रभा –

**प्रभा :** काय काम आहे ?

**बाजीराव :** माझं कसलं काम असणार? आणि असलंच तर तूं थोडीच कबूल होणार?

**प्रभा :** तुमच्या बोलण्याचा अर्थ समजला नाहीं मला.

**बाजीराव :** अर्थ कळला तर अनर्थ व्हायचा! प्रभा, लुगडं अगदींच फाटलं आहे तुझं.

**प्रभा :** तूं कोण काळजी करणारा?

**बाजीराव :** मानला तर आहे नाहीं तर नाहीं. नवं लुगडं घ्यायला पैसे देऊं का?

**प्रभा :** एवढे वर आले आहेत पैसे?

**बाजीराव :** मी कांहीं तुझ्या नवऱ्यासारखा भिकारी नाहीं. चार पैसे जवळ बाळगून आहे.

**प्रभा :** म्हणूनच दुसऱ्यांच्या दारीं असा तुकडे चघळीत बसला आहेस.

**बाजीराव :** मी जेवतों तरी आहे—तुमच्यासारखे उपासतापास तर नाहीं काढीत?

**प्रभा :** आम्हीं उपासतापास काढले तर ते आमच्या घरीं—मोठ्या मानानं. दुसऱ्यांच्या दारीं जाऊन लाजीरवाणं जीणं जगणार नाहीं.

**बाजीराव :** मोठी राजाची राणी आहेस माहित आहे मला. ठेव हे पंधरा रुपये—घे एक चांगलं लुगडं.

**प्रभा :** तुलाच ठेव. इथून हकालपट्टी झाली तर तिकिटाला उपयोगी पडतील.

**बाजीराव :** माझी काळजी तुला नको. तुझ्या अब्रूवर झांकण घालतों आहे ते उपकार समज.

**प्रभा :** तुझ्या उपकारावर जगलें नाहीं आजपर्यंत! शहाणपणा केलास तेवढा पुरे झाला—नाहींतर शोभा होईल चांगली.

**बाजीराव :** माझ्यापेक्षां तुझीच अधिक शोभा होईल. माझ्याजवळ पैसे मागत होतीस असं मीं सगळ्यांना सांगितलं तर?

**प्रभा :** तुझ्यासारखे मूर्खच त्याच्यावर विश्वास ठेवतील.

**बाजीराव :** मला मूर्ख म्हणतेस?–(बाहेरून सगुणा येते) तुला बदनाम करायला मला उशीर लागणार नाहीं.

**सगुणा :** मी जिवंत असेपर्यंत तें शक्य नाहीं.

**प्रभा :** आई–(सगुणेला मिठी मारते)

**सगुणा :** कायरे, आई-बहिणीमधला फरक कळेनासा झाला तुला?

**बाजीराव :** तुझ्या लाडक्या सुनेला विचार. लुगड्यासाठीं पंधरा रुपये मागत होती.

**सगुणा :** त्या भाबड्या पोरीवर असा आरोप करतोस काय? तुझ्यापेक्षां चांगली ओळखतें मी तिला.

**बाजीराव :** दिसायला भाबडी दिसली तरी वैषयिक भावनेनं बेभान झालेली आहे. माझ्याजवळ लगट करण्यापर्यंत तिची मजल गेली होती. मी तिला म्हणालो–पाहिजे तर पंधरा रुपये ठेव लुगड्यासाठीं पण भलतीच गळ घालूं नकोस.

**सगुणा :** असले शब्द बोलण्यापेक्षां तुझी जीभ कां सडून पडली नाहीं? कुठं आहे तुझी बहीण? सुनंदा ए सुनंदा– (सुनंदा येते)

**सुनंदा :** माझं नांव बरं आलं तुमच्या तोंडून! कशाला हांक मारलीत?

**सगुणा :** तुझ्या भावाची कीर्ति ऐकायला.

**सुनंदा :** काय केलं त्यानं?

**सगुणा :** त्यालाच विचार.

**सुनंदा :** बाजीराव, काय केलंस यांचं?

**बाजीराव :** माझ्यावर भलताच आरोप करताहेत.

**सगुणा :** प्रत्यक्ष माझ्या कानांनीं ऐकलं आणि डोळ्यांनीं पाहिलं.

**सुनंदा :** असं झालं तरी काय?

**सगुणा :** या पोरीची अब्रु लुटण्यापर्यंत तुझ्या भावाची मजल गेली. पंधरा रुपये लुगड्यासाठीं देत होता.

**सुनंदा :** होय रे?

**बाजीराव :** हिनं काकुळतीनं मागितले—मला दया आली म्हणून देत होतो पंधरा रुपये—इतक्यात तुझी सासू आली—आणि मला बदनाम करण्याचं नाटक रचलं गेलं.

**सुनंदा :** माझ्या भावावर असला आरोप? बरा कावा रचलां आहांत!

**बाजीराव :** दोघीजणी माझ्यावर तुटून पडल्या.

**सगुणा :** दोषी तो दोषी आणि तूं त्याचाच कैवार घेतेस?

**सुनंदा :** उगाच नाहीं कैवार घेणार. माझ्या भावाची मला खात्री आहे. मोठा दयेचा पुतळा तूं—उपकार करायला गेलास—आणि असला आरोप ओढवून घेतलास!

**बाजीराव :** इतकीं माणसं घरांत असतांना मी असं करीन का?

**सुनंदा :** तूं गप्प रहा. चांगली ओळखतें यांना. मी सुखांत आहे ना तें पहावत नाहीं—कुटुंब फोडलंस असा तुझ्यावर आरोप आहे—तेव्हांच हें कुभांड रचलं गेलं.

**सगुणा :** ही पोर अशी आहे का?

**सुनंदा :** ती कशी आहे तें दिसलंच आतां—आणि तूं तिचाच कैवार घेतेस?

**सगुणा :** मला अरे तुरे म्हणतेस?

**सुनंदा :** मग काय तुझ्या पायाचं तीर्थ घेऊं? मोठी देवता कीं नाहीं?

**सगुणा :** सुनंदा, तोंड आटोपून बोल. जरा मर्यादा ठेव. पुष्कळ पावसाळे जायचे आहेत—इतक्यांत उलटी चालूं नकोस.

**सुनंदा :** तुमच्या जीवावर उलटी चालत नाहीं. मी माझ्या नवऱ्याच्या जीवावर चालते आहे.

**सगुणा :** आतां तुझा नवरा तुला दिसला. मोठा नवऱ्याचा तोरा सांगायला आली. तूं भरल्या घराचे तीनतेरा वाजवलेस आणि आतां भावानं उरलीसुरली अब्रु घेण्याची वेळ आणली.

**सुनंदा :** अजून तोंड आवरा. माझ्या भावाला कलंक लावूं नका. माझा राग अनावर झाला तर सासूचं नातं गुंडाळून ठेवीन.

**सगुणा :** माझ्या अंगावर हात टाकशील का? फार पुढं मजल गेली तुझी.

**प्रभा :** आई, चला तुम्हीं घरांत.

**सगुणा :** हिला घाबरून कीं काय? ती काय करणार आहे माझं? माझ्यावर उगारलेला हात तिथल्या तिथं तुटून पडेल. पांढऱ्या पायाची अवदसा कुठली!

**सुनंदा :** मी अवदसा काय? बाजीराव, बोलाव बघूं त्यांना.

(बाजीराव घरांत जातो)

**सगुणा :** आहे वाटतं घरांत? बोलाव त्याला बाहेर. बायकोचा आणि मेहुण्याचा पराक्रम ऐकूं दे. (विनायक, बाजीराव आंतून येतात)

**विनायक :** काय झालं ग सुनंदा?

**सुनंदा :** काय व्हायचं? लाथेनं मारायचं तेवढं शिल्लक ठेवलंय!

(रडूं लागते)

**सगुणा :** रडून घर डोक्यावर घेऊं नकोस. सगळा प्रकार तुझ्याच तोंडून सांग.

**विनायक :** कसला प्रकार?—

**सगुणा :** तुझी बायको अरेतुरे म्हणूं लागली! आणि हा तुझा नालायक मेहुणा या पोरीची अब्रु घेऊं पहात होता.

**विनायक :** बाजीराव!—

**बाजीराव :** या प्रभानं लुगड्यासाठीं पधंरा रुपये मागितले—मला दया येऊन द्यायला गेलों मी तर या दोघींनीं अतिप्रसंग करीत होतों असा माझ्यावर आरोप केला.

**सुनंदा :** पांढऱ्या पायाची अवदसा म्हणून मला शिव्या देऊं लागल्या. माझा भाऊ जड झाला आहे त्यांना.

**सगुणा :** तुझा यांच्यावर विश्वास आहे?

**विनायक :** तुझ्यापेक्षां त्यांच्याबद्दल खात्री आहे माझी. तुमच्या डोळ्यांत सलतो आहे तो.

**सगुणा :** तुझ्या मेहुण्यावरचा आरोप खोटा आहे ? विचार त्याला.

**विनायक :** त्याला काय विचारायचं ? तो काय कुटुंबांत वाढला नाहीं ? त्याची बहीण तशीच प्रभा. त्याच्यावर असला आरोप करायला कांहीं वाटलं नाहीं तुम्हांला ?

**सगुणा :** म्हणजे आम्हीं खोटीं ? बायकोच्या आणि मेहुण्याच्या शिकवणीनं एवढी बुद्धि फिरली तुझी ?

**विनायक :** माझी बुद्धि शाबूत आहे — तुमचीं डोकीं ताळ्यावर आणलीं पाहिजेत.

**सगुणा :** काय करायचा विचार आहे तुझा ? मला मारायचा ?

**विनायक :** हो — हो. काय म्हणणं आहे तुझं ?

**सगुणा :** मग मार बघूं. तुझा पराक्रम साऱ्या जगाला दिसूं दे. पहिला विनायक राहिला नाहींस तूं. तुझं शिक्षण चुलींत गेलं — बायकोचा बैल झालास तूं.

**विनायक :** आई —

**सगुणा :** आई ? मला आई म्हणून हांक मारायला लाज वाटली पाहिजे तुला. या बाजीरावानं तुझ्या भावजयीच्या अब्रूवर घाला घालण्याचा प्रयत्न केला तरी एक शब्दसुद्धां बोलत नाहींस. उलट त्यांची बाजू घेऊन भांडतोस ? निर्लज्जा, आई म्हणून हांक मारण्यासारखं काय शिल्लक ठेवलं आहेस ?

**विनायक :** ( रागानं बेभान होऊन ) आई — तोंड आवर.

**सगुणा :** मेली तुझी आई. तें नातं संपलं आज. माझा कुणी नाहींस तूं. बायकोच्या तंत्रानं चालणारा निर्बुद्ध बैल आहेस.

**विनायक :** ( सगुणा बोलत असतांनाच — कोपऱ्यांतली काठी विनायक उचलून घेतो ) तुझं बडबडणारं थोबाड याच मार्गानं बंद करावं लागेल. ( डोक्यावर काठीचा फटका मारतो — सगुणा 'देवा रे' म्हणून डोक्यावर हात दाबून धरते — तिच्या हाताला रक्त लागतं — तिला एकदम रडूं कोसळतं )

**सगुणा :** ( अतिशय दीनपणानं ) विनायक, मला मारलंस ? आपल्या आईवर

हात उगारलास? विनाऽऽऽयक (तिचा तोल जातो – प्रभा "आई" असं म्हणून तिला सांवरून धरते)

**सुनंदा :** काय केलंत हें ?

**विनायक :** तुझं समाधान झालं ना ?

[प्रभा सगुणेला धरून खुर्चीवर बसवते – तिचं डोकं फुटलेलं असतं.]

**सगुणा :** माझ्या पोटीं जन्म घेऊन सार्थक केलंस आज.

**प्रभा :** आई, तुम्ही घरांत चला !

**सगुणा :** आतां कशाला घरांत ? मेलें काय जिवंत काय सारखीच.

(बाहेरून नाना आणि मुकुंदा येतात)

**मुकुंदा :** आई ! काय झालं आईला ?

**नाना :** डोकं कसं फुटलं ? रक्त येत आहे.

**सगुणा :** पाय घसरून पडलें. खुर्चीचा दांडा लागला.

**विनायक :** मीं मारलं आईला.

**मुकुंदा :** (राग अनावर होऊन) तूं मारलंस आईला ? दादा – दादा – राक्षसा काय केलंस हें ? तिला मारण्यासाठीं ज्यावेळीं काठी उगारलीस तेव्हां ही आपली आई आहे याचाही विसर पडला तुला ?

**नाना :** अरे, सरळपणानं काय विचारतोस त्याला ? ज्याला आपल्या आईची ओळख नाहीं – त्याला काय माणूस म्हणायचं ? तुझ्याकरतां तिनं त्याग केला त्याचं मोल तूं अशा तऱ्हेनं दिलंस ? त्यापेक्षां जन्मतांच –

**सगुणा :** उगाच अभद्र बोलूं नका ! दुसऱ्या कुणाला मारलं नाहीं ना त्यानं ? आपल्या आईला मारलं !

**मुकुंदा :** आई ! याबद्दल मी त्याला क्षमा करणार नाहीं. मोठा भाऊ म्हणून मानानं वागवलं – पण शेवटीं त्यानं ही पाळी आणली. निर्लज्जा – (विनायकच्या अंगावर धांवून जातो – सगुणा मधें येते)

**सगुणा :** मुकुंदा, मर्यादा सुटली तुझी. कुणाला निर्लज्ज म्हणतोस? वडील भावाला?

**नाना :** वडीलभाऊ? तुझी अशी दशा ज्यानं केली त्याचा कैवार घेतेस? (विनायकास उद्देशून) तूं कर्तबगार होऊन नांवलौकिकाला चढशील–आमचे कष्टाचे–हालाचे दिवस संपतील–अशी केवढी आशा होती मला. अभिमानानं सर्वांना सांगायचा आमच्या विनायकासारखा मुलगा लाखांत सांपडायचा नाहीं–शेवटीं दिवटा निघालास.

**सगुणा :** थांबा तुम्हीं बोलूं नका! माझ्या उपकाराची फेड केली आहे त्यानं–मी बोलतें त्याच्याबरोबर.

**विनायक :** काय केलंत माझ्यासाठीं? आपलं आईबापाचं कर्तव्य केलंत.

**नाना :** आम्हीं आईबापाचं कर्तव्य केलं–पण तुझ्या कर्तव्याचा तुला विसर पडला. आईबाप मुलांना वाढवीत असतात त्यावेळीं त्यांच्या मनांत सदैव एकच विचार असतो–हा मोठा होईल–आपले पांग फेडील. तुझ्या कल्याणासाठीं आम्हीं जें जें केलं त्याची फेड अशा तऱ्हेनं केलीस?

**विनायक :** तेंच योग्य आहे. माझा संताप वाढवूं नका.

**नाना :** तुझा संताप वाढला तर तूं हेंच करणार–मला रक्ताचा अभिषेक घालणार आणि पितृकर्तव्यांतून मोकळा होणार–हेंच आहे ना तुझ्या मनांत? मग वेळ कशाला? ही घे काठी! टाळकं फोड माझं! बघत काय राहिलास? तुझा पराक्रम साऱ्या गांवाला दिसूं दे!

**विनायक :** मुकुंदा–नाना आतां शहाणपणा आवरा–नाहींतर–

**नाना :** बस्सं! आतां काय राहिलं या घरांत? जी शोभा व्हायची ती झाली. असलं लाजीरवाणं जीणं जगण्यापेक्षां या घरांतून तोंड काळं करून जाऊं या. त्याला स्वतंत्र संसार थाटूं दे. काय वाटेल तें करूं दे! मुकुंदा–प्रभा बाहेर पडा! सुतळीच्या एका तोड्यालासुद्धां हात लावूं नका. चला–(बाहेर जायला निघतात–सगुणा त्यांना अडवते)

**सगुणा :** थांबा. माझं ऐका. विनायक, या दोघांवर हात टाकण्याआधीं माझा

मुडदा पाड. माझ्यानं पाहवणार नाहीं. चल–वेळ लावूं नकोस. आईच्या ऋणांतून मोकळा हो.

**विनायक :** एक सारखं तेंच रडगाणं काय गाते आहेस ?

**सगुणा :** रडगाणं नाहीं रे, सत्य तेंच बोलतें आहे मी. तुला ठाऊक आहे, तूं विषारी तापानं आजारी होतास–पावसाचे दिवस होते–घरांत धान्याचा एक दाणा शिल्लक नव्हता. तुला भाताची पेज घालण्यासाठीं टाकळ्याची भाजी खाऊन आम्हीं दिवस काढले. मला वाटे, माझा मुलगा बरा झाला म्हणजे आमच्या कष्टाचं चीज झालं. तशांत वैद्यानं डॉक्टरचं औषध द्यायला सांगितलं. कुठून आणणार एवढा पैसा ? ते सुन्न होऊन खोलीत बसले. डॉक्टर आणल्याशिवाय गत्यंतर नव्हतं. तेव्हां कानांतली कुडीं विकून टाकलीं आणि उघड्या कानांनीं वावरलें. म्हटलं, या निर्जीव दागिन्यापेक्षां चालत्याबोलत्या दागिन्यांनीं घर भरूं दे माझं. देवानं माझं गाऱ्हाणं ऐकलं–डॉक्टरच्या हाताला यश आलं. एकवीस दिवसांनीं तुझा ताप उतरला. डोळे उघडून पाहिलंस–'आई' म्हणून हांक मारलीस–तेव्हां आनंदानं बेहोष होऊन माझ्या अश्रूंनीं तुला आंघोळ घातली–स्वर्गच माझ्या हातांत आला असं मला वाटलं ! विशेष कांहीं केलं नाहीं–माझं–आईचं कर्तव्य केलं.

**नाना :** हें कळण्याइतकी माणुसकी त्याच्यांत असती तर तो असा वागलाच नसता.

**सगुणा :** तूं आजारांतून बरा झालास–पुढचं शिक्षण घेण्याची तुझी इच्छा पाहिली. हे नको म्हणत असतांना बहिणीचे दागिने आणून गहाण ठेवले. तुम्हाला पत्ता लागूं दिला नाहीं–आणि तुला पैसे दिले. शेवटीं दागिने सोडवून देतां आले नाहींत–बहिणीचा दरवाजा कायमचा बंद झाला. म्हटलं तूं नोकरीला राहिल्यावर तिचे दागिने देईन–आणि ऋणांतून मुक्त होईन पण...

**विनायक :** आई ऽ ऽ ! ( सर्वांच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागतात )

**सगुणा :** माझा विनायक मोठा होईल या एकाच आशेवर लोकांचीं उष्टीं-खरकटीं काढलीं–मानापमान सहन केला ! माझ्या मुलासाठीं केलं सारं !

**विनायक :** आई ! आई !! मला क्षमा कर. ( एकदम पाय धरावयाला जातो–बाजीराव त्याला मागं खेंचतो )

**बाजीराव :** विनायक ! कुणाचे पाय धरतो आहेस ? परत तुला कुटुंबांत राबवण्यासाठीं नाटक आहे सारं !

**विनायक :** पाजी माणसा ! तुला काळीज आहे का ? तुझ्यामुळंच हें भरलं घर लयास जाण्याची वेळ आली होती – पण माझं दुर्दैव संपलं – दैवानं हात दिला. माझं कर्तव्य मला कळलं. चल चालता हो माझ्या घरांतून !

**बाजीराव :** मी तुला चांगला मार्ग दाखवला होता – पण तुझी त्या मार्गानं जाण्याची लायकी नाहीं.

**विनायक :** आतां एक शब्द बोलशील तर इथल्याइथं मुडदा पाडीन ! उठव तुझं सामान – चल – हो चालता ! बरोबर लाडक्या बहिणीलाही घेऊन जा !

(बाजीराव बॅग आणतो)

**बाजीराव :** आज ना उद्यां कदाचित मला जावं लागेल हें ठाऊक होतंच. पण सुनंदाला नेण्याची मला काय जरुरी ? कसाईखान्यांत कत्तल करायला एक जनावर शिल्लक असूं दे.

**विनायक :** बेशरम माणसा ! (एकदम बाजीरावाच्या अंगावर धांवत जातो – मुकुंदा त्याला आडवतो – बाजीराव कुणाकडंही न पहातां निघून जातो) तूं कशाला उभी ? – हो चालती भावाबरोबर.

**सगुणा :** या घराची पहिलीवहिली लक्ष्मी ती. मी जिवंत असेपर्यंत तिला कोण घरांतून बाहेर काढणार ? तिलाच दोष देण्यांत काय अर्थ आहे ! तुझ्यामुळंच ती तशी वागली.

**सुनंदा :** आई ! आज मला तुमची खरी किंमत कळली. आई-वडिलांच्या लाडांत वाढल्यामुळं कौटुंबिक त्यागाची किंमत मला कळली नव्हती म्हणून बेफामपणानं वागलें ! माझे अपराध विसरा – मला क्षमा करा ! (सगुणेचे पाय धरते)

**सगुणा :** पोरी, ऊठ वर ! आजपर्यंत सर्वांचे अपराध पोटांत घालीत आलें आहे मी. जरी अधिकारानं बोललें असलें तरी आईच्या मायेनं जवळ घेतलं आहे. हा तुमचा संसार आहे – तुम्हींच संभाळा !

**विनायक :** आई ! केवळ भावनेच्या भरांत माझ्या कर्तव्याचा मला विसर पडून तुझ्यासारख्या देवतेचा जो मी अपमान केला आहे त्याची मला क्षमा करशील ना ?

**नाना :** विनायक –

**सगुणा :** तुम्हीं कांहीं बोलूं नका आतां ! मी तुमची पत्नी असलें तरी त्याची आई आहे. माझ्या मुलानं मला मारलं – आपल्या आईला मारलं. त्याची चूक त्याला समजली. मला क्षमा करायलाच हवी. मी त्याची आई आहे. माझ्याच "पोटचा गोळा" आहे तो !

**विनायक :** आई – ( सद्गदितपणें पायाला मिठी मारतो.

